अकोला महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२४ ला मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- अकोला-१५२३/प्र.क्र.१४/नवि-२६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
४ था मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २० जून, २०२४

**वाचा:-** १) प्रशासक तथा आयुक्त, अकोला महानगरपालिका यांचा प्रशासकीय ठराव क्र.३३, दि. १३ जानेवारी, २०२३.
२) अकोला महानगरपालिकेच्या एकत्रित आकृतिबंधास मान्यता देण्याबाबतचा शासन निर्णय क्र:- अकोला- १५२२/प्र.क्र.१८०/नवि-२६, दि. १३ फेब्रुवारी, २०२३
३) आयुक्त तथा प्रशासक, अकोला महानगरपालिका यांचे पत्र क्र. अमनपा/साप्रवि/आस्था/५२९/२०२३, दि. ०३ ऑक्टोबर, २०२३.

**प्रस्तावना:-**

अकोला महानगरपालिका ही "ड" वर्ग महानगरपालिका असून, सदर महानगरपालिकेची स्थापना दि.१ ऑक्टोबर २००१ रोजी झाली आहे. अकोला महानगरपालिकेचे क्षेत्रफळ १२८ चौ. कि.मी. असून सन २०११ च्या जनगणनेनुसार अकोला शहराची लोकसंख्या ४ लाख २५ हजार इतकी आहे.

२. अकोला महानगरपालिका क्षेत्राच्या नागरीकरणात झालेली वाढ, वाढते औद्योगिक क्षेत्र, लोककल्याणकारी व गतिमान प्रशासन म्हणून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची भुमिका पार पाडताना पायाभुत सुविधांवर पडणारा ताण तसेच केंद्र व राज्य शासनाचे महत्त्वाचे उपक्रम/संस्था/प्रकल्प राबविण्याकरीता अकोला महानगरपालिकेला आवश्यक असलेली पदे, संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली असून अकोला महानगरपालिकेच्या एकूण १५०९ पदांच्या आकृतीबंधास मान्यता देण्यात आली आहे.

३. अकोला महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र.३३, दि. १३ जानेवारी, २०२३ अन्वये सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम २०२४ ला मंजूरी देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम-४५७ (३) अनुसार आयुक्त तथा प्रशासक यांनी अकोला महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२४ मंजूर करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. या सेवाप्रवेश नियमांस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. अकोला महानगरपालिकेने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम-४५७ (३) अनुसार शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या "अकोला महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व

सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२४” या नियमास (परिशिष्ट-१ ते ४ सह) महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम-४५४, ४५५,४५६, ४५७ (३)व ४६५ अन्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर नियमांस “अकोला महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२४” असे संबोधण्यात यावे.

३. सदर नियम शासन राजपत्रात प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०६२०१६४९३५२९२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.06.20 17:06:00 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री (गृह व विधि व न्याय), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती .
५. आयुक्त तथा प्रशासक, अकोला महानगरपालिका, जि. अकोला .
६. प्रधान सचिव (नवि-१) यांचे विशेष कार्यकारी अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्यकारी अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
८. उप सचिव (नवि-२६), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (नवि-२६).

# अकोला महानगरपालिका, अकोला

## सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम २०२४

# अकोला महानगरपालिकेने सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम २०२४

## अनुक्रमणिका

# अकोला महानगरपालिका, अकोला
# सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२४

**महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम. १९४९**

क्रमांक - अकोला-१५२३/प्र.क्र.१४/नवि-२६ **:-** महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५६ (अ) व या अधिनियमातील लागु असलेल्या अन्य तरतुदीव्दारे मिळालेल्या शक्तीचा वापर करुन अकोला महानगरपालिकेच्या अंमलात असलेले सध्याचे सर्व सेवा प्रवेश नियम, तत्संबंधात यापुर्वी करण्यात आलेले ठराव व आदेश तसेच अकोला महानगरपालिका सेवा (सेवा भरती व सेवांचे वर्गीकरण) नियमांचे अधिक्रमण करुन, महाराष्ट्र शासन, याद्वारे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५७ (३) अंतर्गत अनुसार अकोला महानगरपालिकेच्या विविध पदांवर करावयाच्या नियुक्त्यांचे नियमन व सेवांचे वर्गीकरण करण्यासाठी खालील प्रमाणे नियम करीत आहे :-

**नियम**

**१. संक्षीप्त नाव, प्रारंभ व व्याप्ती :-**

१. या नियमांना " अकोला महानगरपालिका अकोला सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम २०२४ " असे संबोधण्यात येईल.

२. **हे नियम अंतिमरित्या शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या तारखे पासुन अंमलात येतील.**

३. हे नियम अकोला महानगरपालिकेमधील सर्व मंजूर पदावरील नियुक्त्यांना लागु होतील; मात्र, अन्यथा नमुद केले नसल्यास, अंशकालीन स्वरुपाच्या नियुक्त्या, कंत्राटी पध्दतीने, किंवा रोजंदारी तत्वावरील नियुक्त्या तसेच मानसेवी स्वरुपाच्या नियुक्त्यांना लागु होणार नाहीत.

**२. व्याख्या :-**

विषय किंवा संदर्भानुसार अन्य अर्थ अभिप्रेत नसल्यास, या नियमांसाठी :-

१. "शासन" म्हणजे, महाराष्ट्र शासन.

२. "अधिनियम" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९

३. "आयोग" म्हणजे, महाराष्ट्र लोकसेवा आयोग.

४. "महानगरपालिका" म्हणजे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनिमय १९४९ च्या तरतुदी अन्वये निर्माण केलेली "अकोला महानगरपालिका."

५. "महापौर" म्हणजे, अकोला महानगरपालिकेचे महापौर.

६. "आयुक्त" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम-३६ अन्वये शासनाने नियुक्त केलेला अधिकारी.

७. "सक्षम प्राधिकारी" म्हणजे, अकोला महानगरपालिकेचे आयुक्त.

८. "नियुक्ती प्राधिकारी" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ५३ च्या पोटकलम (१) ते (३) च्या तरतुदींप्रमाणे नियुक्ती देण्यास सक्षम असलेला अधिकारी.

९. "निवड प्राधिकारी" म्हणजे या नियमातील परिशिष्ट (१) मध्ये विनिर्दिष्टित केलेली कर्मचारी निवड समिती.

१०. "अधिकारी / कर्मचारी" म्हणजे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील प्रकरण-४ कलम-५१ (४) अन्वये नेमणुक केलेले अधिकारी / कर्मचारी.

परंतु यात रोजंदारीवर, हजेरीपटावर असलेले कामगार आणि कंत्राटी पध्दतीने, तसेच अंशकालीन व मानसेवी / मानद स्वरुपी नेमण्यात आलेल्या व्यक्तींचा समावेश होत नाही.

११. "संवर्ग" म्हणजे, एखादया सेवेतील किंवा एखादया सेवेच्या भागातील स्वतंत्र घटक म्हणुन मंजूर केलेल्या "कायम त्याच प्रमाणे हंगामी" शासन मान्य पदांचा समुह.

१२. "कलम" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम.

१३. "परिशिष्ट" म्हणजे, या नियमांना जोडलेली परिशिष्टे.

१४. "जोडपत्र" म्हणजे, या नियमांना जोडलेले जोडपत्र.

१५. "अनुसूची" म्हणजे, या नियमांना जोडण्यात आलेली अनुसूची.

१६. "विभागीय परिक्षा" म्हणजे, अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी विहित केलेली व या नियमांच्या परिशिष्ट-(३) मध्ये नमुद करण्यात आलेली विभागीय परिक्षा.

१७. "पदवी" म्हणजे, संसदेच्या अधिनियमाद्वारे किंवा भारतातील राज्य विधी मंडळाद्वारे विधी संस्थापित असलेले कोणतेही विद्यापिठ किंवा संसदेच्या अधिनियमाद्वारे किंवा तत्सम अधिनियमाद्वारे स्थापन करण्यात आलेल्या कोणत्याही शैक्षणिक संस्थेतुन प्राप्त केलेली पदवी.

१८. "पदविका" म्हणजे, संसदेच्या अधिनियमाद्वारे किंवा भारतातील राज्य विधीमंडळाद्वारे विधी संस्थापित असलेले कोणतेही विद्यापिठ किंवा तंत्रशिक्षण मंडळ किंवा संसदेच्या अधिनियमाद्वारे किंवा तत्सम अधिनियमाद्वारे स्थापन करण्यात आलेल्या कोणत्याही शैक्षणिक संस्थेतुन / तंत्रनिकेतनातुन प्राप्त केलेली पदविका.

१९. "व्यावसायीक अर्हता (Professional Qualification)" म्हणजे, अग्निशमन अभियांत्रिकी पदवी (B.E. Fire), अग्निशमन अभियांत्रिकी उच्च शिक्षण पदविका (Advanced Diploma In Fire Engineering), अग्निशमन अभियांत्रिकी पदविका (Diploma in Fire Engineering), उपअग्निशमन अधिकारी हे पाठयक्रम (राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय नागपुर किंवा राज्य अग्निशमन प्रशिक्षण अकादमी, मुंबई मधुन उत्तीर्ण झालेलेअथवा Institute of Fire (U.K.) किंवा (India) या संस्थेमधून M.I. (Fire) किंवा Grade (I) Fire) उत्तीर्ण झालेले.)

२०. "स्वीयेतर सेवा"(Foreign Services) म्हणजे, ज्या सेवेत अकोला महानगरपालिकेच्या कर्मचाऱ्याला त्यांचे वेतन व भत्ते महानगरपालिकेच्या निधी व्यतिरिक्त अन्य कोणत्याही साधनाव्दारे मिळतात, अशी सेवा.

२१. "मुलाखत" म्हणजे, अकोला महानगरपालिकेच्या पदावरील / पदांवरील नियुक्तीकरीता अर्ज केलेल्या उमेदवारांची सक्षम निवड प्राधिकाऱ्याने किंवा त्यांच्या स्वता:च्या सदस्यांमधुन अशा प्राधिकरणाने नामनिर्देशित केलेल्या एखादया समितीने आणि ज्या पदांकरीता त्याने किंवा तिने अर्ज केला आहे, त्यापदावरील नियुक्त्यांकरीता निवड करण्यासाठी अशा रितीने मुलाखत घेण्यात आलेल्या उमेदवारांची योग्यता किंवा अन्यथा मुल्यमापन करण्याच्या उद्देशाने आणि अशा मुलाखत घेण्यात आलेल्या उमेदवारांना मिळालेल्या गुणांच्या आधारे अनुक्रम लावण्यासाठी घेतलेली मुलाखत असा, आहे.

२२. "समतुल्य / समकक्ष अर्हता" म्हणजे संबंधीत अर्हतेला समान म्हणुन शासनाकडुन जाहीर केलेली अर्हता असा आहे. आणि याबाबत कोणताही संदेह / वाद उद्‌भवल्यास शासनाचा निर्णय अंतिम असेल.

२३. "मान्यताप्राप्त शैक्षणीक संस्था" म्हणजे, शासनाची मान्यता असलेली संस्था, असा आहे.

२४. "मान्यताप्राप्त विद्यापीठ" म्हणजे, सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता असलेले विद्यापीठ, असा आहे.

२५. "माध्यमीक व उच्च माध्यमीक शालांत प्रमाणपत्र परीक्षा" म्हणजे, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाकडून घेण्यात येत असलेली माध्यमीक व

उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परिक्षा, असा आहे आणि यात शासनाने या परीक्षेशी समान म्हणून जाहीर केलेल्या कोणत्याही इतर परीक्षेचा समावेश आहे.

२६. "औद्योगिक प्रशिक्षण संस्था" म्हणजे, राज्य शासनाने विविध प्रकारच्या औद्योगिक व्यवसायाचे प्रशिक्षण देण्यासाठी तयार केलेले औद्योगिक प्रशिक्षण केंद्र, असा आहे.

२७. "समय श्रेणी वेतन" म्हणजे, असे वेतन जे या नियमात घालुन देण्यात आलेल्या कोणत्याही शर्तीच्या अधिन किमान पासुन कमाल पर्यंत नियतकालीन वेतनवाढीने वाढते.

२८. "लेखी परिक्षा" म्हणजे, अकोला महानगरपालिकेकडुन, योग्यरितीने नामनिर्देशित करण्यात आलेल्या एखादया अभिकरणाकडुन, पदाकरीता अर्ज करणाऱ्या उमेदवारांच्या योग्यतेचे किंवा अन्यथा मुल्यमापन करण्याच्या प्रयोजनाकरीता घेतलेली परिक्षा आणि त्या लेखी परिक्षेतील उमेदवारांच्या कामगिरीचा संबंध असेल, तेथवर त्यांच्या गुणवत्तेचा क्रम लावण्याच्या उद्देशाने घेतलेली परिक्षा, असा आहे.

२९. "व्यावसायिक परिक्षा" म्हणजे, उमेदवारांच्या तांत्रिक कौशल्याचे मुल्यमापन करण्यासाठी अकोला महानगरपालिकेने एखाद्या अभिकरणाकडुन अथवा शासकीय / निमशासकीय कार्यालयामार्फत आयोजित केलेली परिक्षा, असा आहे.

३०. "निवड समिती अध्यक्ष" म्हणजे, अधिकारी/ कर्मचारी निवड समितीसाठी सक्षम प्राधिकारी यांची निवड समिती अध्यक्ष म्हणुन नियुक्त केलेले अधिकारी.

३१. "एकीकृत संवर्ग" म्हणजे विविध पदांच्या कर्तव्याचे स्वरुप, ती पदे धारण करण्यासाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता, अनुभव व वेतनश्रेणी यांचा सारासार विचार करुन सेवानियमांसाठी एकीकृत केलेला संवर्ग, असा आहे.

३२. "अर्हता प्राप्त कर्मचारी" म्हणजे, या नियमांच्या परिशिष्ट-२ मध्ये विहित केलेली अर्हता धारण करणारे कर्मचारी.

या नियमांत वापरण्यात आलेले, परंतु व्याख्या न केलेल्या शब्द समुहांचा अर्थ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मध्ये दिल्यानुसार असेल.

## ३ सेवांचे वर्गीकरण (Classification of Services)

१. **प्रशासकीय सेवा :-** सामान्य प्रशासन, परिमंडळ कार्यालय प्रशासन, प्रभाग प्रशासन, कर व महानगरपालिका सचिवालय अंतर्गत असलेल्या विभागातील सेवा या प्रशासकीय सेवा संबोधण्यात येतील.

२. **लेखा व वित्त सेवा व लेखा परिक्षण सेवा :-** महानगरपालिकेच्या आर्थीक व्यवस्थापनाची संबंधीत (अर्थ संकल्प, लेखा, लेखापरिक्षण, लेखा आक्षेप निराकरण व खर्च व्यवस्थापन इत्यादी) सेवातील पदांना "लेखा संवर्ग व लेखा परिक्षण संवर्ग" असे संबोधले जाईल व अशा पदांची सेवा "लेखा सेवा व लेखा परिक्षण सेवा" संबोधण्यात येईल.

३. **तांत्रिक संवर्ग आणि तांत्रिक सेवा :-** ज्या पदावरील नियुक्त्यांसाठी सांविधीक/ मान्यता प्राप्त विद्यापीठ / अभियांत्रीकी पदवी/ पदविका, सांविधनिक विद्यापिठ/ अभिमत विद्यापिठ / राज्य तंत्र शिक्षण मंडळ (Board of Technical Education) वा केंद्रीय तंत्रशिक्षण मंडळ (Board of Central Technical Education) तंत्रशिक्षण परिषद (Technical Council) यांच्या मार्फत चालविले जाणारे विविध तांत्रिक व अभियांत्रिकी व अभियांत्रिकी विषयक अभ्यासक्रम अशी किमान शैक्षणिक अर्हता विहित केली असेल, अशा पदांची सेवा "तांत्रिक सेवा" संबोधली जाईल. व अशा पदांना "तांत्रिक संवर्ग" संबोधले जाईल.

४. **वैद्यकिय संवर्ग आणि वैद्यकिय सेवा :-** ज्या पदावरील नियुक्तीसाठी कोणत्याही मान्यता प्राप्त विद्यापिठाचा वैद्यकिय शास्त्राचा पदवीधारक, पदव्युत्तर पदवीधारक /

पदविकाधारक तसेच मेडिकल कौन्सील ऑफ इंडिया, आयुष वा तत्सम आयुर्वेदिक कौन्सील, युनानी, होमीओपॅथिक कौन्सील यांच्याकडील नोंदणी हि किमान शैक्षणीक अर्हता विहित केली असेल, अशा पदांना "वैद्यकिय संवर्ग" संबोधण्यात येईल व अशा पदांची सेवा "वैद्यकिय सेवा" संबोधली जाईल.

५. **निमवैद्यकिय संवर्ग आणि निम वैद्यकिय सेवा :-** वैद्यकिय सेवेतील पदांना सहाय्यकारी असणाऱ्या पदांच्या संवर्गाला, उदा. स्टाफ नर्स, परिचारीका मिडवाईफ, प्रयोगशाळा तंत्रज्ञ, औषध निर्माता (फार्मासिस्ट) इत्यादी पदांच्या सेवेला "निमवैद्यकिय संवर्ग" व अशा पदांच्या सेवेला "निमवैद्यकिय सेवा" संबोधण्यात येईल.

६. **अग्निशमन सेवा :-** महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीव सुरक्षा उपाययोजना अधिनियम, २००७ मध्ये समाविष्ट असलेल्या अग्निशमन सेवेला "अग्निशमन सेवा" संबोधण्यात येईल.

७. **स्वच्छता सेवा** :- घनकचरा व्यवस्थापन विभागाशी संबंधीत अधिकारी / कर्मचारी उदा. मुख्य स्वच्छता अधिकारी, उपमुख्य स्वच्छता अधिकारी, वरिष्ठ स्वच्छता निरिक्षक, हिवताप पर्यवेक्षक, स्वच्छता निरिक्षक, मुकादम (स्वच्छता) आणि सफाई कामगार व तत्सम पदांच्या सेवेला "स्वच्छता सेवा" संबोधण्यात येईल.

८. **अकोला महानगरपालिका सेवांचे गट पुढील प्रमाणे असतील** :- १. अधिकारी-गट-अ व गट-ब, २. कर्मचारी गट-क व गट-ड.

**४. नेमणुकीची पध्दत व अर्हता :-**

**१. नियुक्तीची पध्दत :-** महानगरपालिकेतील विविध पदांवर नियुक्त्यांसाठी कार्यपध्दती परिशिष्ट-१ मध्ये विहित केल्यानुसार व शिक्षण, अनुभव, इ. आवश्यक अर्हता परिशिष्ट-२ मध्ये विहीत केल्याप्रमाणे असतील. नियुक्तींची पध्दत महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ५४ व अनुसुची-ड मधील प्रकरण ३ नुसार असेल.

**२. भारतीय नागरीकत्व आणि महाराष्ट्र राज्याचे अधिवास प्रमाणपत्र :-** उमेदवार भारताचा नागरीक असावा आणि महाराष्ट्र १५ वर्ष अधिवास (Domicile) करत असल्याबाबत त्याने सक्षम प्राधिकाराचे प्रमाणपत्र किंवा महाराष्ट्रात जन्म झाल्याबाबत जन्म दाखला अर्जासोबत सादर करणे आवश्यक राहील.

**३. संगणक हाताळणी / वापराबाबतच्या ज्ञानाची आवश्यकता :-**परिशिष्ट-२ मध्ये विहित केलेल्या अर्हते व्यतीरिक्त गट-ड ची पदे वगळता इतर सर्व पदांवरील नेमणुकीसाठी / पदोन्नतीसाठी शासन वेळोवेळी आदेश काढुन निश्चित करेल, असे संगणक हाताळणी / वापराबाबतचे ज्ञान (महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT किंवा DOEEACC सोसायटीच्या अधिकृत CCC किंवा O/A/B/C स्तर पैकी कोणतीही एक परिक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र इत्यादी), एक अतिरिक्त आवश्यक अर्हता असेल.

**४. वयोमर्यादा :-** महानगरपालिकेतील कोणत्याही पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी किमान वयाची अट १८ वर्ष पूर्ण व कमाल वयोमर्यादा महाराष्ट्र शासनाचे प्रचलित नियम व त्या अनुषंगाने वेळोवेळी काढण्यात आलेले शासन निर्णयात नमुद केल्यानुसार असेल सामाजिक आरक्षण लागु असणाऱ्या प्रवर्गाकरीता प्रचलित शासन निर्णयानुसार वयोमर्यादा शिथिलक्षम असेल.

**५. पदोन्नती व नामनिर्देशनाद्वारे करावयाच्या नियुक्त्यांचे प्रमाण :-**

**क)** नामनिर्देशन वा पदोन्नतीचे प्रमाण "परिशिष्ट-२" मध्ये संबंधीत पदासमोर दर्शविल्यानुसार असेल तथापी, ज्या पदासमोर असे प्रमाण विहित केलेले नसेल अशा पदावरील नियुक्त्यांसाठी पदोन्नती व नामनिर्देशनाचे प्रमाणे ५०:५० असे राहील.

**ख)** पदोन्नतीच्या साखळीतीलएकाकी पद सामान्यत: पदोन्नतीने भरण्यात येईल. तथापी, विशिष्ट अर्हता आवश्यक असलेल्या एकाकी पदावर पदोन्नतीने नियुक्त्यांसाठी उमेदवार उपलब्ध नसल्यास तसे पद प्रतिनियुक्तीनेभरता येईल तरीही उमेदवार उपलब्ध होत नसल्यास एखादया विशिष्ट प्रकरणी सदर पद शासन मान्यतेने नामनिर्देशनाने / सरळसेवेने भरता येईल.

**५. <u>पदोन्नतीने नेमणुक करणे :-</u>**

पदोन्नतीने करावयाची कोणतीही नियुक्ती, "जेष्ठता-नि-पात्रता" या तत्वावर, अर्हता प्राप्त कर्मचाऱ्यामधुन केली जाईल. त्या कर्मचाऱ्याला विभागीय परिक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम ४५ अंतर्गत येणारी पदे तसेच वर्ग-१ ची इतर सर्व पदे पदोन्नतीने भरतांना, सर्वसाधारण सभेच्या ठरावानंतर त्यास शासनाची पुर्व मंजूरी घेतल्यानंतरच पदोन्नतीने भरता येतील.

**६. <u>प्रतिनियुक्तीद्वारे नेमणुक :-</u>**

या नियमांमध्ये विहित केलेल्या अर्हतेनुसार महानगरपालिकेतील ज्या पदांवर प्रतिनियुक्तीद्वारे नेमणुक करण्याची तरतुद आहे, अशी पदे केंद्र शासन, राज्य शासन, इतर स्थानिक स्वराज्य संस्था व स्थानिक प्राधिकरणातील अधिकाऱ्यांमधुन शासनाच्या प्रचलित धोरणानुसार प्रतिनियुक्तीने भरता येतील. सदर प्रतिनियुक्तीचा कालावधी हा शासनाच्या प्रचलित नियमापेक्षा अधिक असणार नाही. सदर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपताच संबंधीत अधिकारी / कर्मचारी याची प्रतिनियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

**७. <u>महानगरपालिकेतील अधिकारी/कर्मचारी यांच्या बदल्या</u>:-**

महानगरपालिकेतील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या बदल्या महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ तसेच यासंदर्भात वेळोवेळी शासनाने दिलेल्या निर्देशानुसार करणे आवश्यक राहील.

**८. <u>एका महानगरपालिकेतून दुसऱ्या महानगरपालिकेत बदलीने नियुक्ती :-</u>**

या नियमात अन्यत्र काहीही नमुद केले असलेतरी, एका महानगरपालिकेतील एखाद्या कर्मचाऱ्याने अन्य महानगरपालिकेतील सम सवंर्गीय पदावर बदलीने नियुक्तीसाठी अर्ज सादर केल्यास, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील तरतुदीनुसार व दोन्ही महानगरपालिकांतील नियुक्ती प्राधिकाऱ्यांच्या परस्पर संम्मतीने मान्य होतील, अशा अटी व शर्तीवर, खालील बाबींच्या अधिनराहुन बदलीने नियुक्ती देता येईल.

**अ)** पदोन्नतीने भरण्यात येणाऱ्या पदांवर कायमस्वरुपी बदलीने नियुक्ती करण्यात येणार नाही. फक्त नामनिर्देशनाने / सरळसेवेने नियुक्ती करीता राखुन ठेवण्यात आलेल्या सम संवर्गीय व समान वेतन श्रेणीच्या रिक्त पदांवर बदलीने कायमस्वरुपी नियुक्ती करण्यात यावी.

**ब)** अशी नियुक्ती झाल्यानंतर त्या पदधारकाची जेष्ठता नियुक्तीच्या दिनांकास त्या पदाच्या संवर्गात सर्वात कनिष्ठ (Zero Seniority) राहील.

**क)** गट-अ आणि गट-ब मधील अधिकाऱ्यांच्याबाबत अन्य महानगरपालिकेतुन अकोला महानगरपालिकेत बदलीचा निर्णय दोन्ही महानगरपालिकांच्या परस्पर संम्मतीने निश्चित अटी व शर्तीवर, शासन मान्यतेने घेतला जाईल.

**ड)** केवळ विहित प्रक्रियेद्वारे व शासनमान्य पदावर नियुक्त असलेल्या कर्मचाऱ्यांचा विचार केला जाईल.

**९. परिविक्षाधिन कालावधी :-**

गट-अ आणि गट-बमध्ये नामनिर्देशनाद्वारे / सरळ सेवेने नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांसाठी परिविक्षाधिन कालावधी त्यांच्या नेमणुकीच्या मुळ दिनांकापासुन ०२ वर्षाचा असेल. परिविक्षाधिन कालावधी राज्य शासनाच्या लागु असलेल्या अटी व शर्तीनुसारपूर्ण केल्याचे आदेश निर्गमित करण्यात येतील. तसेच अशा उमेदवारांचे परिविक्षाधिन कालावधीतील काम समाधानकारक नसल्यास अपवादात्मक बाब म्हणुन आणि तत्संबंधी कारणे नमुद करुन परिक्षा कालावधी पुढील एका वर्षापर्यंतच वाढविता येईल. तद्नंतरही या वाढीव कालावधीत काम समाधानकारक नसल्यास सदर व्यक्तीची सेवा समाप्त करण्यात येईल.

**१०. भाषा परिक्षा, विभागीय परिक्षा व प्रशिक्षण :-**

महानगरपालिका सेवेतील पदांवर नेमणुक करण्यात आलेल्या किंवा त्यासाठी निवडण्यात आलेल्या उमेदवारांनी :-

१. **परिशिष्ट-३ अन्वये** विहित करण्यात येतील अशा भाषा परिक्षा आणि / किंवा चाचण्या उत्तीर्ण होणे किंवा त्यांना विहित नियमानुसार त्यापैकी कोणतीही परिक्षा पास होण्यापासुन सुट मिळविणे आवश्यक असेल.
२. **परिशिष्ट-३** अन्वये विहित केलेली विभागीय परिक्षा उत्तीर्ण होणे अथवा अशी परिक्षा उत्तीर्ण होण्यापासुन सुट मिळविणे आवश्यक असेल.
३. वेळोवेळी ठरवुन देण्यात येईल असे सेवाप्रवेशपुर्व आणि / किंवा सेवा प्रवेशोत्तर प्रशिक्षण घेणे सुध्दा आवश्यक असेल.

**११. महानगरपालिका सेवेतील पदांवर नियुक्तीसाठी अनर्हता :-**

एखादया व्यक्तीस :-

**क) महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या**कलम ५९ च्या तरतुदी प्रमाणे अनर्ह ठरविण्यात आले असेल, किंवा

**ख)** महानगरपालिकेच्या सेवेतुन किंवा कोणत्याही स्थानिक प्राधिकरणाच्या सेवेतुन किंवा कोणत्याही सरकारी सेवेतुन गैरवर्तणुकी बद्दल बडतर्फे करण्यात आले असेल किंवा,

**ग)** ज्यामध्ये नैतिक अध:पाताचा समावेश होईल अशा अपराधाबद्दल तीला दोषी ठरविण्यात आले असेल, किंवा

**घ)** जर त्याच्या एका पेक्षा अधिक पत्नी हयात असतील आणि स्त्री उमेदवाराच्या बाबतीत जर तीने ज्याची पत्नी हयात आहे अशा व्यक्तीशी विवाह केला असेल, किंवा

**च)** जर त्यास / तीस दोन पेक्षा अधिक हयात अपत्य असतील, किंवा महाराष्ट्र नागरीसेवा (लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन) नियम २००५ मधील तरतुदीची पुर्तता करीत नसेलकिंवा

**छ)** न्यायालयात ज्या गुन्हासाठी कैदेची शिक्षा फर्मावता येते. अशा गुन्हयासाठी सहा महिण्याहुन अधिक मुदतीची कैदेची शिक्षा झाली असेल व ती शिक्षा अपिल वा पुनरीक्षणात रद्द झाली नसेल, अशी व्यक्ती किंवा

**ज)** महानगरपालिकेच्या सेवेत असतांना सिध्दपराध होवून ६ महिन्यांपेक्षा अधिक मुदतीची कैदेची शिक्षा झाली असेल व ती शिक्षा अपिल वापुनरीक्षणात रद्द झाली नसेल.

अशी व्यक्ती महानगरपालिकेच्या सेवेत नेमणुक देण्यास वा नेमणुक चालु ठेवण्यास अपात्र समजली जाईल.

**१२. <u>महानगरपालिका सेवेतील पदांवर आरक्षण :-</u>**

महानगरपालिका सेवेतील पदांना शासनाच्या प्रचलित धोरणानुसार आरक्षण लागु असेल. यामध्ये मागसवर्गीयांसाठी आरक्षण (सामाजिक आरक्षण) विशेष / समांतर आरक्षण, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, माजी सैनिक, भुकंपग्रस्त / प्रकल्पग्रस्त, दिव्यांग, महिला, खेळाडु, अनाथ, अंशकालीन कर्मचारीइ.साठीच्या आरक्षणाचा समावेश असेल.

**१३. <u>शारिरीक पात्रता प्रमाणपत्र आणि चारित्र पडताळणी अहवाल :-</u>**

महानगरपालिका सेवेतील कोणत्याही पदावरील नामनिर्देशनाने/सरळसेवेने नियुक्ती :-

**अ)** महानगरपालिकेच्या सक्षम वैद्यकिय अधिकाऱ्याचे / जिल्हा शल्य चिकित्सक रुग्णालय यांनी विहित नमुन्यातील आरोग्य विषयक वैद्यकिय प्रमाणपत्र सादर केल्यानंतर;आणि

**ब)** उमेदवारांच्या पुर्व चारित्र्य पडताळणी बाबत ( Verification of Antecedents) पोलिस विभागाचे / सक्षमप्राधिकाऱ्याकडुन अहवाल प्राप्त झाल्यानंतर केली जाईल.

**१४. <u>परिक्षेकरीता / मुलाखती करीता केलेल्या प्रवासाचा खर्च :-</u>**

नामनिर्देशन / सरळसेवेद्वारे नियुक्ती करण्याच्या बाबतीत, परिक्षेच्या / मुलाखतीच्या प्रयोजना करीता उमेदवारांना करावे लागणारे सर्व प्रवास हे, याबाबतीत काही विनिर्दिष्ट प्रवर्गाच्या उमेदवाराच्या संबंधात वेळोवेळी शासन / महानगरपालिकेकडुन मंजूर करण्यात आलेल्या कोणत्याही सवलतीच्या अधिनराहुन, स्वत:च्या खर्चाने असतील. याबाबतचा अंतिम निर्णय घेण्याचा अधिकार सक्षम प्राधिकारी यांना असेल.

**१५. <u>नियुक्ती करीता निवड झाल्यावर पदस्थापना :-</u>**

नियुक्ती करीता निवड झालेले उमेदवार हे अकोला महानगरपालिकेच्या हद्दीत कोठेही किंवा अकोला महानगरपालिकेच्या किंवा भविष्यकाळात हद्दीच्या बाहेर महानगरपालिकेचे कार्यालय सुरु करु शकेल, तेथे पदस्थापना केले जाण्यास पात्र ठरतील.

**१६. <u>प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष दबावतंत्राचा वापर :-</u>**

कोणत्याही उमेदवाराच्या नियुक्ती संदर्भात प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षरित्या दबाव आणण्याचा केलेला प्रयत्न हा त्या उमेदवाराला त्या पदावरील नियुक्तीसाठी अनर्ह करणारा ठरेल.

**१७.** हे नियम अस्तित्वात येण्यापुर्वी विहित मार्गाने झालेल्या सरळ सेवा नियुक्त्यांना शासनाने अन्यथा वेगळे लेखी कारणे नमुद करुन निर्देश दिले नसतील तर या नियमातील तरतुदीमुळे बाधा येणार नाही.

**१८.** वेळोवेळी सरळसेवा / पदोन्नती / प्रतिनियुक्ती प्रमाण व पध्दती सेवाभरती / आरक्षण / वयोमर्यादा, परिविक्षाधिन कालावधी नियमित करणे, इ. बाबत निर्देश देणारे राज्य शासनाचे नियम, अधिनियम, निर्णय व न्यायनिर्णय यानुसार या नियमात सुधारणा (Amendment) करण्यात येईपर्यंत या शासन निर्णय / न्याय निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल.

**१९.** सरळसेवा / पदोन्नतीने नियुक्त झालेल्या अधिकारी / कर्मचारी यांचेसाठी राज्य शासनाने वेळोवेळी विहित केलेले प्रशिक्षण धोरणाची अंमलबजावणी करावी.

**२०.** या नियमामधील कोणत्याही तरतुदीच्या अर्थविवरणाबाबत शंका उद्भवल्यास सदर बाब शासनाकडे निर्देशीत करण्यात येईल व त्याबाबतीत शासनाचा निर्णय अंतिम राहिल.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.06.20 17:06:33 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**वैद्यकिय प्रमाणपत्राचा नमुना**

**(नियम ४ पहा)**

( महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती ) नियम १९८१ मधील नियम-११ पहा )

मी याद्वारे प्रमाणित करतो / करते की......................................................... अकोला महानगरपालिकेच्या (.............................) संवर्गातील (..........................................) या पदावर नेमणुक करण्यासाठी असलेले उमेदवाराची तपासणी केली आणि त्याला / तीला ..................................................
अतिरिक्त (संसर्गिक किंवा अन्य) कोणताही रोग, शारिरीक दुर्बल्य किंवा शारिरीक अपंगत्व असल्याचे आढळले नाही. ही गोष्ट (..............................................) कार्यालयात (............................... ) म्हणुन नेमणुकीसाठी अनर्ह ठरविणार आहे. असे मला वाटत नाही.

श्री./ श्रीमती................................................. यांच्या स्वता:च्या निवेदनावरुन त्यांचे / तिचे वय ......... वर्ष आहे आणि दिसण्यावरुन तो / ती सुमारे ......... वर्ष वयाचा / वयाची आहे. त्याला / तिला लस टोचण्यात आली आहे.

ओळख चिन्हे ..............................................

डाव्या हाताच्या आंगठयाचा ठसा ...............................................

वैद्यकिय अधिकाऱ्याचे नाम ..............................................

वैद्यकिय अधिकाऱ्याची स्वाक्षरी ...............................................

**वैद्यकिय अधिकाऱ्याचे पदनाम**

**(शिक्क्यासह)**

## अकोला महानगरपालिका, अकोला सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम २०२४
## परिशिष्ट-(१)

## अकोला महानगरपालिका, अकोला सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण ) नियम २०२४ अंतर्गत सेवा भरतीसाठी अनुसरावयाची कार्यपध्दती :-

**१. अधिकारी / कर्मचारी निवड समिती :-**

महानगरपालिका पदांवर नियुक्तीकरीता महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ५४ मध्ये विहित केल्यानुसार कर्मचारी निवड समिती गठीत करण्यात येईल. सदर समिती गठीत करण्यात आलेल्या दिनांकापासुन एक वर्ष कालावधीकरीता अथवा भरती प्रक्रिया पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीकरीता ( यातील जो कालावधी कमी असेल त्या कालावधीकरीता ) वैध राहील.

या व्यतीरिक्त नामनिर्देशन / सरळसेवेने नियुक्ती करतांना, मागासवर्गीय तसेच महिला उमेदवाराच्या हित रक्षणासाठी अशा समितीचे सदस्य म्हणुन शासनाच्या प्रचलित आदेशानुसार संबंधीत विभागाच्या अधिकाऱ्यांना मुलाखतीच्या वेळेस विशेष निमंत्रीत म्हणुन बोलाविले जाईल.

**२. नामनिर्देशनद्वारे / सरळसेवेद्वारे करावयाच्या नियुक्तीसाठी कर्मचारी निवड समितीची रचना खालील प्रमाणे असेल.**

| | | |
|---|---|---|
| **१.** | आयुक्त किंवा आयुक्तांनी पदनिर्देशित केलेल्या अन्य कोणताही अधिकारी | - अध्यक्ष |
| **२.** | मुख्य लेखापरीक्षक | - सदस्य |
| **३.** | संबंधीत विभाग प्रमुख | - सदस्य |
| **४** | आयुक्तांनी नामनिर्देशित केलेला मागासवर्गीय प्रवर्गातील अधिकारी | - सदस्य |
| **५.** | जिल्हा महिला व बालकल्याण अधिकारी | - सदस्य |
| **६.** | जिल्हा समाज कल्याण अधिकारी | - सदस्य |
| **७.** | प्रकल्प अधिकारी, एकात्मीक आदीवासी विकास प्रकल्प | - सदस्य |
| **८.** | उपायुक्त (आस्थापना) | - सदस्य सचिव व निमंत्रक |

**३. <u>नामनिर्देशन / सरळसेवेद्वारे नेमणुकीकरीता कार्यपध्दती</u>**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत भरावयाची महानगरपालिकेमधील पदे निश्चित करुन सदर पदे भरण्यासंदर्भात शासनाने निर्देश दिल्यानंतर संबंधीत पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगा मार्फत भरण्याची कार्यवाही करण्यात यावी. सद्यस्थितीत महानगरपालिकेतील पदे भरण्यासंदर्भात पुढील कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

**अ)** एखादया पदावरील नियुक्तीसाठी, ऑनलाईन / वृत्तपत्रातील जाहिरातीला अनुसरुन किंवा महानगरपालिकेच्या सुचना फलकावरील सुचनेस अनुसरुन विहित मुदतीत प्राप्त झालेल्या अर्जांचा किंवा सेवा विनियम केंद्राकडुन वा शासनाच्या आदेशानुसार अन्य संस्था / कार्यालयाकडुन आलेल्या यादीतील उमेदवाराच्या नावाचाच विचार करता येईल.

**ब)** उमेदवारांने अर्जात दिलेल्या तपशिला बाबत अधिक माहिती मागविण्याचा अधिकार आयुक्तांना असेल.

**क)** जाहिरातील / सेवा विनियम केंद्राकडे पाठविलेल्या मागणी पत्रात लेखी चाचणीचा उल्लेख असल्यास अशा उमेदवारांना लेखी चाचणी दयावी लागेल.

**ड)** चाचणी परिक्षेत किमान ५०% गुण मिळविण्याच्या मर्यादेच्या अधिनराहुन रिक्त पदाच्या तिप्पट ऐवढया उमेदवारांना वरिल (क) च्या निर्णयाप्रमाणे चाचणी परिक्षा न घेतल्यास, अशा सर्व निर्देशित पात्रता धारण करणाऱ्या उमेदवारांना मुलाखतीसाठी बोलविले जाईल व अशा उमेदवारांची यादी निवड समितीच्या प्रत्येक सदस्यास मुलाखतीच्या वेळी पुरविण्यात येईल.

परंतु, अनुसुचित जाती / अनुसुचित जमाती / विमुक्त जाती / भटक्या जमाती / विशेष मागास प्रवर्ग / इतर मागासवर्गीय / आर्थिक दृष्टया दुर्बल घटक / उमेदवारासाठी ५०% ऐवजी ४५% गुण मिळविण्याची अट राहील.

**इ.** मुलाखतीस खालील बार्बीवर विशेष लक्ष दिले जाईल :-

१. सामाजिक प्रश्नाबाबतची जाणीव

२. पुर्वानुभव :- ज्या पदांवर नेमणुक दयावयाची त्या पदासाठी आवश्यक असा अनुभव.

३. सेवा भरती नियमात विशेष अर्हता वा इतर कोणत्याही बाबतीत प्राधान्य नमुद असल्यास त्यासाठी दयावयाचे गुण.

**ई.** निवड समिती यानंतर एकुण गुण लक्षात घेवून गुणांच्या उतरत्या क्रमाने उमेदवारांची यादी तयार करील व ती आयुक्तांकडे गोपनियरित्या बंद लिफाफ्यात सादर करील.

**फ.** भरती प्रक्रिये साठी सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी दिलेले निर्देश लागु राहतील.

**४. <u>पदोन्नतीने नेमणुकीकरीता कार्यपध्दती :-</u>**

**अ)** सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रं.एसआरव्हि-२०१८ / प्र.क्र.१५९ / का-१२ / दिनांक ०१ ऑगस्ट २०१९ मध्ये तसेच वेळोवेळी शासनाच्या प्रचलित निर्णयान्वये दिलेल्या निर्देशनाप्रमाणे दरवर्षी पदोन्नतीची प्रक्रिया विहित कालमर्यादेत पूर्ण होण्यासाठी वेळा पत्रकाचे काटेकोरपणे पालन करणे बंधनकारक राहील.

**ब)** प्रत्येक वर्षी ०१ सप्टेंबर ते ३१ ऑगस्ट या कालावधीत प्रत्येक संवर्गात पदोन्नतीने किती भरावी लागणार आहेत याचा आढावा सामान्य प्रशासन विभागमार्फत जुन महिण्यात आयुक्तांना सादर करतील.

**क)** उपरोक्त शासन परिपत्रकानुसार कार्यवाही करतांना, पदोन्नतीने भरावयाच्या पदांची संख्या निश्चित झाल्यावर आवश्यक अर्हता धारण करणाऱ्या कर्मचाऱ्यांमधुन जेष्ठतानुक्रमाने पदांच्या संख्येच्या तिप्पट (१:३) कर्मचाऱ्यांच्या पदोन्नतीचा विचार क्षेत्रात (Zone of Consideration) समावेश करण्यात येईल.

**ड)** विभागीय चौकशी सुरु असलेल्या तसेच निलंबीत असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांची नावे जेष्ठतानुक्रमाने यादीत येत असल्यास, त्यांची नावे यादीतुन वगळण्यात येवु नयेत, त्यांच्या नावाचा विचार केल्यावर निवड समितीच्या अभिप्राय त्यांच्या नावासमोर नोंदविण्यात येईल.

**इ)** पदोन्नतीसाठी पात्र ठरलेल्या कर्मचाऱ्यांच्या निवडसुचित जेष्ठतेनुसार समावेश करण्यात येईल.

**ई)** निवड समिती कर्मचाऱ्यांचे मागील ५ वर्षाचे गोपनिय अहवाल आणि त्यांच्या पुढे ठेवलेली इतर कागदपत्रे यांचे अवलोकन करुन कर्मचाऱ्यांच्या पदोन्नतीच्या योग्यतेबद्दल निर्णय घेईल. मात्र असा निर्णय एक मताने झाला नाही तर त्याबद्दलचा अंतिम निर्णय समिती प्रमुखाचा असेल.

**फ)** कर्मचाऱ्यांच्या निवडी संबधी अंतिम निर्णय घेण्यापुर्वी अधिक माहितीची आवश्यकता वाटल्यास अशी माहिती मागविण्याचा समितीस अधिकार असेल.

**५.** वरिल (३) व (४) नुसार निवड समितीने केलेली शिफारस महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम - ५३ (१), ५३ (२) वा ५३ (३) नुसार संबंधीत सक्षम नियुक्ती प्राधिकाऱ्याकडे मान्यतेसाठी ठेवली जाईल.

**६.** तयार करण्यात आलेली निवड सुची त्या त्या निवड सुचीच्या वर्षासाठी वैध असेल.

**७.** समिती सचिव बैठकीच्या कार्यवृत्तांत तयार करुन त्यास समितीची मान्यता घेण्यास जबाबदार असेल सदस्यांना सादर केलेली सर्व कागदपत्रे परत घेवून ती एकत्रित जतन करण्याची जबाबदारी समिती सचिवाची असेल.

**८.** गट-क आणि गट-ड मध्ये सेवा भरती करतांना सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्रं.न्याप्र-१००३ / ९९ / प्र.क्र.-२ / ०३ (भाग-२) / १६अ / दिनांक २५ ऑक्टोंबर २००५ अन्वये एकत्रित मार्गदर्शक तत्वेलागु असेल तेथे अवलंबन करण्यात यावा. या मार्गदर्शक तत्वामध्ये वेळोवेळी होणारे बदलही अंमलात आणण्यात यावे.

**९.** गट-क व गट-ड मधील अनुकंपाच्या भरावयाच्या पदांसाठी आयुक्तांच्या शिफारशीने व शासन मान्यतेने अधिसंख्य पदे निर्माण करता येतील.

**१०.** पदोन्नतीसाठी निवड समितीची रचना खालील प्रमाणे असेल

| | | |
|---|---|---|
| **१.** | आयुक्त किंवा आयुक्तांनी पदनिर्देशित केलेल्या अन्य कोणताही अधिकारी | - अध्यक्ष |
| **२.** | मुख्य लेखापरीक्षक | - सदस्य |
| **३.** | संबंधीत विभाग प्रमुख | - सदस्य |
| **४** | आयुक्तांनी नामनिर्देशित केलेला मागासवर्गीय प्रवर्गातील अधिकारी | - सदस्य |
| **५.** | दिव्यांग अधिकारी / कर्मचारी प्रतिनिधी | - सदस्य |
| **६.** | उपायुक्त (आस्थापना) | -सचिव व निमंत्रक |

VIDYA RAMAPPA
HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40,
cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.06.20 17:06:50 +05'30'

( विद्या हम्पय्या )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**अकोला महानगरपालिका**

**परिशिष्ट (२)**

**महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या, कलम ३६, कलम ३९ (अ), ४५ व ५३(१) चे तरतुदीनुसार नेमणुक करावयाच्या अधिकाऱ्यांच्या पदांसाठीची कलम ४५ (३) व ४५७ (३) अन्वये विहित शैक्षणिक व इतर अर्हता**

**(पहा [नियम ३] )**

**प्रशासकीय सेवा**

| अ. क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पध्दत व टक्केवारी १)नामनिर्देशन २)पदोन्नती ३)प्रतिनियुक्ती | नेमणुकीकरीता अर्हता व नेमणुकीच्या पध्दती |
|---|---|---|---|
| १ | **आयुक्त** गट-अ प्रशासकीय सेवा | प्रतिनियुक्ती १००% | राज्य शासनाकडुन वेळोवेळी नेमणुक करण्यांत येईल असा अधिकारी (महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ३६ प्रमाणे) |
| २ | **अतिरिक्त आयुक्त** गट-अ प्रशासकीय सेवा | प्रतिनियुक्ती ५०% | महाराष्ट्र शासन नगरविकास विभागाकडील शासन निर्णय क्रमांक एमसीओ२०१४/प्र.क्र.२१८/नवि-१४ दि. ०६ जानेवारी, २०१५ व शासन निर्णय क्रमांक एमसीओ २०२१/प्र.क्र.१९१/नवि-१४ दि. २२ /०२/२०२२ नुसार महाराष्ट्र शहरी प्रशासकीय सेवा / मुख्याधिकारी (न.प्र.) संवर्गातील समकक्ष पदावरील वेतन श्रेणीतील अधिकारी यांची महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३९(अ) प्रमाणे शासनाकडुन वेळोवेळी नेमणुक करण्यात येईल. |
| | | पदोन्नती ५०% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाच्या कोणत्याही शाखेची पदवी किंवा समकक्षअर्हता<br>ब) महानगरपालिका उपआयुक्त पदावरील किंवा समकक्ष पदावरील किमान ३ वर्षाचा अनुभव आवश्यक |
| ३ | **उपआयुक्त** गट-अ प्रशासकीय सेवा | पदोन्नती ५०% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाच्या कोणत्याही शाखेची पदवी किंवा समकक्षअर्हता आणि<br>ब) अकोला महानगरपालिका सहा. आयुक्त व महानगरपालिका सचिव या पदावरील किमान ०३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या अधिका-याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्तीने नियुक्ती करता येईल. (महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ४५(२) नुसार महानगरपालिका व शासन मान्यता आवश्यक) |
| | | प्रतिनियुक्ती ५०% | महाराष्ट्र शासन, नगरविकास विभाग अधिसुचना क्र.एमसीओ -२०२१/प्र.क्र.१८२/नवि-१४ दि. ०१ नोव्हेंबर, २०२१ व शासन निर्णय क्र. एमसीओ -२०२१/प्र.क्र.१९१/नवि-१४ दि. २२/०२/२०२२ नुसार महाराष्ट्र शहरी प्रशासकीय सेवा / मुख्याधिकारी सेवेतील श्रेणी-अ मधील अधिका-यांची शासनाकडुन प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| ४ | **मुल्य निर्धारण कर संकलन अधिकारी** गट-अ प्रशासकीय सेवा | प्रतिनियुक्ती १०० % | महाराष्ट्र शासन, नगरविकास विभाग अधिसुचना क्र.एमसीओ -२०२१/प्र.क्र.१८२/नवि-१४ दि. ०१ नोव्हेंबर, २०२१ व शासन निर्णय क्र. एमसीओ -२०२१/प्र.क्र.१९१/नवि-१४ दि. २२/०२/२०२२ नुसार महाराष्ट्र शहरी प्रशासकीय सेवा / मुख्याधिकारी सेवेतील श्रेणी-अ मधील अधिका-यांची शासनाकडुन प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| ५ | **महानगरपालिका सचिव** गट-ब प्रशासकीय सेवा | पदोन्नती १०० % | अकोला महापालिका आस्थापनेवरील उपसचिव किंवा विधी अधिकारी पदाचा किमान ०३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेला व विधी शाखेची पदवीधारण करणाऱ्या अधिकाऱ्यांची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ६ | **सहायक आयुक्त** गट-ब | पदोन्नती ५० % | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अधिक्षक या पदावर किमान ०३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या व मान्यता प्राप्त |

| | | | |
|---|---|---|---|
| | प्रशासकीय सेवा | | विद्यापिठाची पदवीधारण करणाऱ्या व L.G.S. पदविका उत्तीर्ण झालेला अधिका-याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| | | प्रतिनियुक्ती ५०% | महाराष्ट्र शासन, नगरविकास विभाग अधिसुचना क्र. एमसीओ - २०२१/प्र.क्र.१८२/नवि-१४ दि. ०१ नोव्हेंबर, २०२१ व शासन निर्णय क्र. एमसीओ-२०२१/प्र.क्र.१९१/ नवि-१४ दि. २२/०२/२०२२ नुसार महाराष्ट्र शहरी प्रशासकीय सेवा / मुख्याधिकारी सेवेतील श्रेणी-ब मधील अधिका-याची शासनाकडुन प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| ७ | **सहायक मुल्य निर्धारण कर संकलन अधिकारी** गट-ब प्रशासकीय सेवा | प्रतिनियुक्ती १००% | महाराष्ट्र शासन, नगरविकास विभाग अधिसुचना क्र. एमसीओ - २०२१/प्र.क्र.१८२/नवि-१४ दि. ०१ नोव्हेंबर, २०२१ व शासन निर्णय क्र. एमसीओ-२०२१/प्र.क्र.१९१/नवि-१४ दि. २२/०२/२०२२ नुसार महाराष्ट्र शहरी प्रशासकीय सेवा / मुख्याधिकारी सेवेतील श्रेणी-ब मधील अधिका-याची शासनाकडुन प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| ८ | **महानगरपालिका उप सचिव** गट-ब प्रशासकीय सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिका आस्थापनेवरील सहा. विधी अधिकारी किंवा अधीक्षक या पदावरील किमान ०३ वर्षाची नियमित सेवा व विधी शाखेची पदवी धारण केलेल्या अधिकाऱ्यामधुन सामाईक ज्येष्ठता सुचीतून जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ९ | **विधी अधिकारी** गट-ब प्रशासकीय सेवा | पदोन्नती १०० % | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सहा. विधी अधिकारी संवर्गात ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या व मान्यता प्राप्त विद्यापिठाची विधी शाखेची पदविधारण करणाऱ्या अधिकाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| १० | **समाज विकास अधिकारी** गट-ब प्रशासकीय सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापने वरील अधिक्षक या पदावरील ०३ वर्षाचा अनुभव धारण करणाऱ्या व मान्यता प्राप्त विद्यापिठाची समाजशास्त्र शाखेची पदव्युत्तर पदवी धारण करणाऱ्या व L.G.S. पदविका उत्तीर्ण असणाऱ्या अधिकाऱ्यामधुन जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ११ | **शिक्षणाधिकारी** गट-ब प्रशासकीय सेवा | पदोन्नती १००% | अ) अकोला महानगरपालिकेच्या आस्थापने वरील मुख्याध्यापक या पदावरील किमान ०३ वर्षाची नियमित सेवापूर्ण झालेल्या व मान्यता प्राप्त स्तानक व बि.एड. पदवी असावी.<br>ब) विभागीय परिक्षा उत्तीर्ण करणे आवश्यक आहे.<br>क) सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| १२ | **अधिक्षक** गट-क प्रशासकीय सेवा | पदोन्नती १००% | अ) शासन मान्य विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी व L.S.G.D. उत्तीर्ण.<br>ब) अकोला महानगरपालिका आस्थापनेवरील सहा.अधिक्षक या संवर्गातील किंवा समकक्षपदावरील किमान ०३ वर्षाची नियमित सेवा.<br>क) विभागीय परिक्षा उत्तीर्ण आवश्यक. |
| १३ | **प्रशासन अधिकारी (शिक्षण)** गट-क प्रशासकीय सेवा | प्रतिनियुक्ती १००% | राज्यशासनाच्या शालेय शिक्षण विभागाकडील प्रचलीत सेवा प्रवेश नियम व धोरणानुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| १४ | **जनसंपर्क अधिकारी** गट-क प्रशासकीय सेवा | पदोन्नती १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी किंवा समकक्षअर्हता.<br>ब) शासन मान्य पत्रकारीता व जनसंज्ञापन (Journalism & Mass Communication) मधील पदविका धारण करणाऱ्या अकोला महानगरपालिका आस्थापनेवरील सहा. अधिक्षक या संवर्गातील कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्याआधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |

| | | | |
|---|---|---|---|
| १५ | **सहायक अधिक्षक**<br>गट-क<br>प्रशासकीय सेवा | पदोन्नती १००% | अ) अकोला महानगरपालिका आस्थापनेवरील वरिष्ठ लिपिक यासंवर्गातील किंवा समकक्ष पदावरील किमान ०३ वर्षाची नियमित सेवा.<br>ब) विभागीय परिक्षा उत्तीर्ण आवश्यक.<br>क) L.S.G.D. परिक्षा उत्तीर्ण. |
| १६ | **सहायक विधी अधिकारी**<br>गट -क<br>प्रशासकीय सेवा | नामनिर्देशन /<br>सरळ सेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापिठाची विधी शाखेची पदवी.<br>ब) उच्च न्यायालय किंवा त्यांच्या अधिपत्याखालील इतर न्यायालयामध्ये किमान ०३ वर्ष अभिवक्ता / वकील म्हणुन किंवा शासकीय / स्थानिक स्वराज्य संस्थेमधील संबंधीत कामाचा किमान ०३ वर्षाचा अनुभव आवश्यक.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| १७ | **लघुलेखक (निम्नश्रेणी)**<br>गट -क<br>प्रशासकीय सेवा | नामनिर्देशन /<br>सरळ सेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी<br>ब) राज्य शासनाची मराठी व इंग्रजी लघुलेखनाची १०० श.प्र.मी.वेगाची परिक्षा उत्तीर्ण<br>क) मराठी टंकलेखन ४० श.प्र.मि.(जीसीसी)/इंग्रजी टंकलेखन ४० श.प्र.मि.परिक्षा उत्तीर्ण प्रमाणपत्र आवश्यक.<br>ड) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई. यांचेकडील अधिकृत MS-CIT परिक्षा उत्तीर्ण किंवा D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत C.C.C. किंवा O स्तर किंवा A स्तर किंवा B किंवा C स्तर पैकी कोणतीही एक परिक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र.<br>इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| १८ | **वरिष्ठ लिपीक**<br>गट -क<br>प्रशासकीय सेवा | पदोन्नती १००% | अ) अकोला महानगरपालिका आस्थापनेवरील लिपीक / दूरध्वनी चालक या संवर्गात जेष्ठता व गुणवतेच्या आधारे किमान ०३ वर्षाच्या नियमित सेवा पूर्ण केलेल्या कर्मचाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>ब) MSCIT परिक्षा उर्त्तीर्ण आवश्यक.<br>क) L.S.G.D. परिक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक. (हे सेवाप्रवेश नियम निर्गमित झाल्याच्या दिनांकास लिपीक संवर्गातील अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कार्यरत कर्मचाऱ्यांना उच्च माध्यमीक शालांत परिक्षा उत्तीर्ण ही अट लागू राहील. मात्र त्यानंतर नियुक्त होणाऱ्या लिपीक संवर्गातील कर्मचारी यांना पदोन्नतीसाठी मान्यता प्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी अशी अट लागू राहील.) |
| १९ | **लिपीक**<br>गट -क<br>प्रशासकीय सेवा | नामनिर्देशन/<br>सरळसेवा ५०% | अ) मान्यता प्राप्त विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी<br>ब) राज्य शासनाचे मराठी टंकलेखन ३० श.प्र.मि. (जीसीसी) / इंग्रजी टंकलेखन ४० श.प्र.मि. परिक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक<br>क) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परिक्षा उत्तीर्ण अथवा D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत C.C.C. किंवा O स्तर किंवा A स्तर किंवा B किंवा C स्तर पैकी कोणतीही एक परिक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र.<br>ड)मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| | | पदोन्नती ५०% | अ)अकोला महानगरपालिका आस्थापनेवरील वर्ग-४ श्रेणीतील पदावर किमान ०३ वर्षाची नियमित सेवा झालेला कर्मचारी<br>ब) उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (H.S.C.) उत्तीर्ण.<br>(हे सेवाप्रवेश नियम निर्गमित झाल्याच्या दिनांकास चतुर्थ श्रेणी संवर्गातील अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कार्यरत कर्मचाऱ्यांना उच्च माध्यमीक शालांत परिक्षा उत्तीर्ण ही अट लागू राहील. मात्र त्यानंतर नियुक्त होणाऱ्या लिपीक संवर्गातील कर्मचारी यांना पदोन्नतीसाठी मान्यता प्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी अशी अट लागू राहील.) |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | क) राज्य शासनाचे मराठी टंकलेखन ३० श.प्र.मि. (जीसीसी) / इंग्रजी टंकलेखन ४० श.प्र.मि. परिक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक ड) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई. यांचेकडील अधिकृत MS-CIT परिक्षा उत्तीर्ण किंवा D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत C.C.C. किंवा O स्तर किंवा A स्तर किंवा B किंवा C स्तर पैकी कोणतीही एक परिक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>उक्त विहित केलेली अर्हता धारण करणाऱ्या कर्मचाऱ्यांची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करतायेईल. |
| २० | **दूरध्वनी चालक**<br>गट -क<br>प्रशासकीयसेवा | नामनिर्देशन<br>सरळसेवा १००% | अ) उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (H.S.C.) उत्तीर्ण.<br>ब) शासकीय अथवा शासनमान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचा टेलिफोन ऑपरेटर अभ्यासक्रम उत्तीर्ण आवश्यक व MSCIT परिक्षा उत्तीर्ण.<br>क) मराठी / हिंदी व इंग्रजी भाषेचे ज्ञानआवश्यक. |
| २१ | **दप्तरी**<br>गट -ड<br>प्रशासकीय सेवा | पदोन्नती १००% | अ) अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील गट-ड शिपाई संवर्गामधील किमान ०३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>ब) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| २२ | **शिपाई**<br>गट -ड<br>प्रशासकीय सेवा | नामनिर्देशन<br>सरळसेवा १००% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत परिक्षा उत्तीर्ण.<br>ब) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |

**तांत्रिक सेवा / अभियांत्रिकी सेवा**

| | | | |
|---|---|---|---|
| २३ | **शहर अभियंता (स्थापत्य)**<br>गट -अ<br>अभियांत्रिकी सेवा | प्रतिनियुक्ती १०० % | राज्य शासनाच्या अधिक्षक अभियंता या पदावरील अधिकाऱ्यांमधून प्रचलित धोरणानुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| २४ | **कार्यकारी अभियंता (स्थापत्य)**<br>गट -अ<br>अभियांत्रिकी सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उपअभियंता (स्थापत्य) या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या अधिकाऱ्यांची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| | | प्रतिनियुक्ती | पदोन्नतीसाठी योग्य अधिकारी उपलब्ध न झाल्यास राज्य शासनाच्या अधिक्षक अभियंता संवर्गातील अधिका-यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| २५ | **सहायक संचालक (नगररचना)**<br>गट -अ<br>अभियांत्रिकी सेवा | प्रतिनियुक्ती १०० % | संचालक, नगररचना व मुल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांच्या आस्थापनेवरील समकक्ष अधिका-याची शासनाकडुन प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| २६ | **उपअभियंता स्थापत्य (सा.बां)**<br>गट -अ<br>अभियांत्रिकी सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील शाखा अभियंता स्थापत्य (सा.बां./कर/न.र./जल) या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण केलेल्या अधिकाऱ्यांची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| २७ | **उपअभियंता स्थापत्य (जल)**<br>गट -अ<br>अभियांत्रिकी सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील शाखा अभियंता स्थापत्य (सा.बां./कर/न.र./जल) या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण केलेल्या अधिकाऱ्यांची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| २८ | **उपअभियंता यांत्रिकी (जल)** | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील शाखा अभियंता यांत्रिकी (मो.वा./जल) या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण |

| | | | |
|---|---|---|---|
| | गट -अ<br>अभियांत्रिकी सेवा | | केलेल्या अधिकाऱ्यांची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **२९** | **उपअभियंता (विद्युत)**<br>गट -अ<br>अभियांत्रिकी सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील शाखा अभियंता (विद्युत) या पदावर किमान ०३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण केलेल्या अधिकाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **३०** | **पर्यावरण संवर्धन अधिकारी**<br>गट -अ<br>अभियांत्रिकी सेवा | सरळसेवा १०० % | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची पर्यवरणअभियांत्रिकी शाखेची पदवी.<br>ब) पर्यावरण संवर्धन क्षेत्रातील किमान ३ वर्षाचा अनुभव.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| **३१** | **नगररचनाकार**<br>गट -ब<br>अभियांत्रिकी सेवा | प्रतिनियुक्ती १०० % | संचालक, नगररचना व मुल्य निर्धारण संचालनालय महाराष्ट्र राज्य यांच्या आस्थापनेवरील समकक्ष अधिका-याची शासनाकडुन प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| **३२** | **शाखा अभियंता स्थापत्य (जल)**<br>गट -ब<br>अभियांत्रिकी सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कनिष्ठ अभियंता (स्थापत्य / यांत्रिकी) या पदावरकिमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **३३** | **शाखा अभियंता स्थापत्य (बांधकाम)**<br>गट -ब<br>अभियांत्रिकी सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कनिष्ठ अभियंता (स्थापत्य / यांत्रिकी) या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **३४** | **शाखा अभियंता यांत्रिकी (मो.वा./जल)**<br>गट -ब<br>अभियांत्रिकी सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कनिष्ठ अभियंता यांत्रिकी (मो.वा./जल) या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **३५** | **शाखा अभियंता (विद्युत)**<br>गट -ब<br>अभियांत्रिकी सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कनिष्ठ अभियंता (विद्युत) या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **३६** | **सहायक नगररचनाकार**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | नामनिर्देशन/सरळ सेवा ५०% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची / संस्थेची बी.ई. स्थापत्य किंवा बी. आर्कीटेक्ट परिक्षा उत्तीर्ण.<br>ब) कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) किंवा तत्सम पदाचा किमान ३ वर्षाच्या अनुभव धारकास प्राधान्य. |
| | | पदोन्नती ५०% | नामनिर्देशासाठी विहित केलेली अर्हता धारण करणाऱ्या कनिष्ठ अभियंता या पदावरील किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्यांची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल |
| **३७** | **मुख्य आरेखक**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील आरेखक या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **३८** | **कनिष्ठ अभियंता स्थापत्य (बांधकाम)**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | नामनिर्देशन/सरळसेवा ९०% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रीकी शाखेची पदवी<br>ब) स्थापत्य अभियांत्रीकी शाखेतील पदव्युत्तर पदवी परीक्षा उर्तीर्ण असल्यास प्राधान्य.<br>क) नेमणुकी नंतर ३ वर्षात कनिष्ठ अभियंता व्यवसायीक परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य आहे.<br>ड) महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांच्याकडील अधिकृत MSCIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| | | पदोन्नती १०% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उक्त नामनिर्देशनाची अर्हता धारण करणाऱ्या सर्व्हेअर, आरेखक यापदावर किमान ३ |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल तसेच पदोन्नतीने पद उपलब्ध होत नसल्यास सरळसेवेने पद भरता येईल. |
| **३९** | **कनिष्ठ अभियंता स्थापत्य (न.र.)**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | नामनिर्देशन/सरळसेवा ९०% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रीकी शाखेची पदवी<br>ब) स्थापत्य अभियांत्रीकी शाखेतील पदव्युत्तर पदवी परीक्षा उर्तीर्ण असल्यास प्राधान्य<br>क) नेमणुकी नंतर ३ वर्षात कनिष्ठ अभियंता व्यावसायीक परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य आहे.<br>ड) महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांच्याकडील अधिकृत MSCIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र<br>इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| | | पदोन्नती १०% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उक्त नामनिर्देशनाची अर्हता धारण करणाऱ्या सर्व्हेअर, आरेखक यापदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल तसेच पदोन्नतीने पद उपलब्ध होत नसल्यास सरळसेवेने पद भरता येईल. |
| **४०** | **कनिष्ठ अभियंता स्थापत्य (जल)**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | नामनिर्देशन/सरळसेवा ९०% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रीकी शाखेची पदवी<br>ब) स्थापत्य अभियांत्रीकी शाखेतील पदव्युत्तर पदवी परीक्षा उत्तीर्ण असल्यास प्राधान्य<br>क) नेमणुकीनंतर ३ वर्षात कनिष्ठ अभियंता व्यवसायीक परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य आहे.<br>ड) महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांच्याकडील अधिकृत MSCIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र<br>इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| | | पदोन्नती १०% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उक्त नामनिर्देशनाची अर्हता धारण करणाऱ्या सर्व्हेअर, आरेखक यापदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल तसेच पदोन्नतीने पद उपलब्ध होत नसल्यास सरळसेवेने पद भरता येईल. |
| **४१** | **कनिष्ठ अभियंता स्थापत्य (करवसुली)**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | नामनिर्देशन/सरळसेवा ९०% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रीकी शाखेची पदवी<br>ब) स्थापत्य अभियांत्रीकी शाखेतील पदव्युत्तर पदवी परीक्षा उर्तीर्ण असल्यास प्राधान्य.<br>क) नेमनुकी नतंर ३ वर्षात कनिष्ठ अभियंता व्यवसायीक परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य आहे.<br>ड) महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांच्याकडील अधिकृत MSCIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र<br>इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| | | पदोन्नती १०% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उक्त नामनिर्देशनाची अर्हता धारण करणाऱ्या सर्व्हेअर, आरेखक यापदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल तसेच पदोन्नतीने पद उपलब्ध होत नसल्यास सरळसेवेने पद भरता येईल. |
| **४२** | **कनिष्ठ अभियंता (विद्युत)**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | नामनिर्देशन/सरळसेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची विद्युत अभियांत्रीकी शाखेची पदवी<br>ब) विद्युत अभियांत्रीकी शाखेतील पदव्युत्तर पदवी परीक्षा उर्तीर्ण असल्यास प्राधान्य.<br>क) अनुभव धारकास प्राधान्य.<br>ड) महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांच्याकडील अधिकृत MSCIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र<br>इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| **४३** | **कनिष्ठ अभियंता (यांत्रिकी )**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | नामनिर्देशन/सरळसेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची यांत्रिकी अभियांत्रीकी शाखेची पदवी<br>ब) यांत्रिकी अभियांत्रीकी शाखेतील पदव्युत्तर पदवी परीक्षा उत्तीर्ण असल्यास प्राधान्य.<br>क) अनुभव धारकास प्राधान्य.<br>ड) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ मुंबई यांच्याकडील अधिकृत MSCIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र.<br>इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| **४४** | **सर्व्हेअर**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | नामनिर्देशन/<br>सरळ सेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापिठाची स्थापत्य अभियांत्रिकी शाखेची पदविका किंवा महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत परिक्षा उत्तीर्ण<br>ब) मान्यता प्राप्त औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचा २ वर्षाचा सर्वेक्षक व्यवसायाचे प्रमाणपत्र.<br>क) मराठी / इंग्रजी टंकलेखनाचे श.प्र.मि. ३०/४० वेग मर्यादेचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र किंवा संगणक टंकलेखनाचे प्रमाणपत्र धारण केलेले असावे.<br>ड) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| **४५** | **आरेखक**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | नामनिर्देशन<br>सरळ सेवा १००% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमीक शालांत प्रमाणपत्र (एस.एस.सी.) परिक्षा उत्तीर्ण.<br>ब) शासनमान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचा अनुरेखक / आरेखक अभ्यासक्रम पूर्णकेल्याचे प्रमाणपत्र व मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>क) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ मुंबई यांच्याकडील अधिकृत MSCIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र. |
| **४६** | **मॅकेनिक**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | नामनिर्देशन/<br>सरळ सेवा १००% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमीक शालांत प्रमाणपत्र (एस.एस.सी.) परिक्षा उत्तीर्ण.<br>ब) शासनमान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचे ऑटोमोबाईल-फिटर/ यांत्रिकी-फिटर / डिझेल मॅकनिक /मोटार मॅकनिक कोर्स आवश्यक व मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>ड) अनुभवधारकास प्राधान्य. |
| **४७** | **इलेक्ट्रीशियन**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | पदोन्नती १००% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमीक शालांत प्रमाणपत्र (एस.एस.सी.) परिक्षा उत्तीर्ण.<br>ब) शासनमान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचा विजतंत्री अभ्यासक्रम पूर्णकेल्याचे प्रमाणपत्र व वायरमन या पदावर किमान ०३ वर्षाचाअनुभव. |
| **४८** | **वायरमन**<br>गट -क<br>अभियांत्रिकी सेवा | नामनिर्देशन/<br>सरळसेवा १००% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमीक शालांत प्रमाणपत्र (एस.एस.सी.) परिक्षा उत्तीर्ण.<br>ब) शासन मान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचा तारतंत्री अभ्यासक्रम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र व एन.सी.टी.व्हि.टी.चे प्रमाणपत्र असल्यास प्राधान्य.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>ड) अनुभव धारकास प्राधान्य. |

**माहिती व तंत्रज्ञान सेवा**

| | | | |
|---|---|---|---|
| **४९** | **सिस्टीम मॅनेजर ( ई-प्रशासन)**<br>गट -ब<br>तांत्रिक सेवा | पदोन्नती १००% | अ) अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सिस्टीम ॲनालिस्ट या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>ब) पदोन्नतीने उमेदवार उपलब्ध न झाल्यास नामनिर्देशनाने घेता येईल. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | अर्हता.<br>१) मान्यता प्राप्त विद्यापिठाची संगणक अभियांत्रीकी पदवी. (B.E/B.Tech.COMPUTER)<br>२) डेटा सेन्टर ॲडमिनिस्ट्रेशन, प्रोग्रामिंग, सॉप्टवेअर डेव्हलपमेंट तसेच नेटवर्कींग (लॅन व वॅन) COMPUTER हार्डवेअर मधील ३ वर्षाचा अनुभव. |
| **५०** | **सिस्टीम ॲनालिस्ट**<br>गट -क<br>तांत्रिकसेवा | नामनिर्देशन<br>सरळ सेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची संगणक अभियांत्रिकी मधील पदवी (B.E/B.Tech.COMPUTER) परिक्षा उत्तीर्ण.<br>ब) सिस्टीम ॲनालिसिस/ प्रोग्रामिंग / सॉप्टवेअर डेव्हलपमेंट मधील किमान ०३ वर्षाचा अनुभव.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| **५१** | **कनिष्ठ अभियंता (संगणक)**<br>गट -क<br>तांत्रिकसेवा | नामनिर्देशन<br>सरळ सेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची संगणक अभियांत्रिकी मधील पदवी (B.E.COMPUTER) किंवा समकक्ष अर्हता.<br>ब) संगणक प्रोग्रामिंग / देखभाल व दुरुस्तीचा ३ वर्षाचा अनुभव असल्यास विशेष प्राधान्य.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |

**लेखा व वित्त सेवा व लेखा परिक्षण सेवा**

| | | | |
|---|---|---|---|
| **५२** | **मुख्य लेखापरिक्षक**<br>गट -अ<br>लेखा परिक्षण सेवा | प्रतिनियुक्ती १००% | शासनाकडील महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील वरिष्ठ गट-अ (उपसंचालक) या अधिका-यांमधुन प्रतिनियुक्तीने. |
| **५३** | **मुख्य लेखा व वित्त अधिकारी**<br>गट -अ<br>लेखा व वित्त सेवा | प्रतिनियुक्ती १००% | शासनाकडील महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील वरिष्ठ गट-अ (उपसंचालक) या अधिका-यांमधुन प्रतिनियुक्तीने. |
| **५४** | **उपमुख्य लेखा परिक्षक**<br>गट -ब<br>**लेखा परिक्षण सेवा** | पदोन्नती १००% | अ) अकोला महानगरपालिकेच्या वरिष्ठस्तर विभागीय परिक्षा (लेखा)उत्तीर्ण. लेखापाल / अंतर्गत लेखापरिक्षक या पदावर किमान ३ वर्षाची सेवा पूर्ण करणे आवश्यक.<br>ब) मान्यता प्राप्त विद्यापीठाची वाणिज्य शाखेची पदवी धारण करणाऱ्या अधिकाऱ्याची सेवा जेष्ठता वगुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **५५** | **लेखाधिकारी**<br>गट -ब<br>लेखा व वित्त सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या वरिष्ठस्तर विभागीय परिक्षा (लेखा) उत्तीर्ण. लेखापाल / अंतर्गत लेखा परिक्षक या पदावर किमान ३ वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या व मान्यता प्राप्त विद्यापीठाची वाणिज्य शाखेची पदवी धारण करणाऱ्या अधिकाऱ्याची सेवा जेष्ठता वगुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **५६** | **लेखापाल**<br>गट -क<br>लेखा व वित्त सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या वरिष्ठस्तर विभागीय परिक्षा (लेखा) उत्तीर्ण असलेल्या उपलेखापाल / वरिष्ठ लेखा परिक्षक या पदावरील किमान ०३ वर्षाचा अनुभव मान्यता प्राप्त विद्यापिठाची वाणिज्य शाखेची पदवी धारणकरणाऱ्या अधिका-यातुन जेष्ठता व पात्रतेच्या निकषान्वये पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **५७** | **अंतर्गत लेखा परिक्षक**<br>गट -क<br>लेखा परिक्षण सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या वरिष्ठस्तर विभागीय परिक्षा (लेखा) उत्तीर्ण असलेल्या वरिष्ठ लेखापरिक्षक व उपलेखापाल या पदावरील किमान ०३ वर्षाचा अनुभव असणा-या अधिका-यातुन जेष्ठता व पात्रतेच्या निकषान्वये पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **५८** | **उपलेखापाल**<br>गट -क<br>लेखा व वित्त सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कनिष्ठ लेखा परिक्षक, रोखपाल या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या व मान्यता प्राप्त विद्यापीठाची वाणिज्य शाखेची पदवी धारण करणाऱ्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता वगुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |

| | | | |
|---|---|---|---|
| ५९ | **वरिष्ठ लेखा परिक्षक**<br>गट -क<br>लेखा परिक्षण सेवा | पदोन्नती १०० % | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कनिष्ठ लेखा परिक्षक, रोखपाल या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या व मान्यता प्राप्त विद्यापीठाची वाणिज्य शाखेची पदवी धारण करणाऱ्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ६० | **कनिष्ठ लेखा परिक्षक**<br>गट -क<br>लेखा परिक्षण सेवा | पदोन्नती १०० % | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील लिपीक या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या व मान्यताप्राप्त विद्यापीठाची वाणिज्य शाखेची पदवी धारण करणाऱ्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ६१ | **रोखपाल**<br>गट -क<br>लेखा व वित्त सेवा | पदोन्नती १०० % | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील लिपीक या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या व मान्यता प्राप्त विद्यापीठाची वाणिज्य शाखेची पदवी धारण करणाऱ्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |

**वैद्यकिय सेवा**

| | | | |
|---|---|---|---|
| ६२ | **वैद्यकिय आरोग्यअधिकारी (एम.ओ.एच./ निबंधक)**<br>गट -अ<br>वैद्यकिय सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कार्यरत C.T.O., R.C.H., R.M.O. व साथरोग या पदाचा किमान ३ वर्षाचा अनुभव व मान्यता प्राप्त विद्यापिठाची पदव्युत्तर पदवी. M.D.(P.S,M), / M.D. / M.S. / D.P.H. अर्हता धारण करणाऱ्या कर्मचाऱ्यांची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| | | प्रतिनियुक्ती | (पदोन्नतीसाठी अधिकारी उपलब्ध न झाल्यास ) सदर अधिकारी उपलब्ध होईपर्यंत शासनाकडील समकक्ष अधिकाऱ्याची प्रतिनियुक्तीच्या धोरणानुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| ६३ | **वैद्यकिय अधिकारी (शहर क्षयरोग) (सि.टी.ओ.)**<br>गट -अ<br>वैद्यकिय सेवा | नामनिर्देशन सरळ सेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची M.D. (Chest, TB & Respiratory diseases पदव्युत्तर पदवीधारक उपलब्ध न झाल्यास संबंधीत विषयामधील पदव्युत्तर पदविका (D.N.B chest) धारकामधुन भरता येईल.<br>ब) शासन / केंद्र शासन / निमशासकीय / स्थानिक स्वराज्य संस्था यांच्याकडील वैद्यकिय अधिकारी व तत्सम पदावरील किमान ०३ वर्षाचा पर्यवेक्षीय व कार्यकारी पदाचा अनुभव आवश्यक.<br>क) रुग्णालयातील प्रशासन, सार्वजनिक आरोग्य व प्रतिबंधात्मक उपचारात्मक बाबी समर्थपणे हाताळण्यांचा व विशेषत: स्वच्छता पर्यवेक्षण, साथ आजार निर्मुलन कार्यक्रम, हिवताप नियंत्रण आदी बाबीच्या कार्याचा किमान ०३ वर्षाचा प्रत्यक्षअनुभव धारण करणा-या उमेदवारांस प्राधान्य. |
| | | प्रतिनियुक्ती | (नामनिर्देशन योग्य अधिकारी उपलब्ध न झाल्यास) नामनिर्देशनासाठी विहीत केलेली शैक्षणिक अर्हता व अनुभव धारण करणा-या शासनाकडील योग्य अधिका-यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| ६४ | **वैद्यकिय अधिकारी (माता बालसंगोपन) (आर.सी.एच. ऑफीसर)**<br>गट -अ<br>वैद्यकिय सेवा | नामनिर्देशन/ सरळ सेवा १००% | अ)मान्यता प्राप्त विद्यापीठाची M.D.(P.S,M) परिक्षा उत्तीर्ण किंवा एम.डी. स्त्री रोग / बालरोग तज्ञ व प्रसुती रोग शास्त्र पदव्युत्तर पदवी तथापी पदव्युत्तर पदवीधारक उमेदवार उपलब्ध न झाल्यास संबंधीत विषयातील पदव्युत्तर पदवी धारकामधुन (डी.जी.ओ.) मधुन भरता येईल.<br>ब) शासन/केंद्र शासन/निमशासकीय/स्थानिक स्वराज्य संस्था / खाजगी रुणालयातील संबंधीत विषयातील कामकाजाचा ०३ वर्षाचा अनुभव आवश्यक.<br>क) मराठी भाषेचा ज्ञान आवश्यक. |
| | | प्रतिनियुक्ती | (नामनिर्देशन योग्य अधिकारी उपलब्ध न झाल्यास) नामनिर्देशनासाठी विहीत केलेली शैक्षणिक अर्हता व अनुभव धारण करणा-या शासना कडील योग्य अधिका-यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |

| | | | |
|---|---|---|---|
| **६५** | **वैद्यकिय अधिकारी (साथरोग)** गट -अ वैद्यकिय सेवा | नामनिर्देशन/ सरळ सेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापिठाची वैद्यकिय पदवी (एम.बी.बी.एस.)<br>ब) महाराष्ट्र मेडिकल कौन्सील अधिनियम अंतर्गत नोंदणी आवश्यक.<br>क) केंद्र / राज्य / निमशासकीय / स्थानिक स्वराज्य संस्था यांचे मधील संबंधीतकामाचा किमान ०३ वर्षाचा अनुभव आवश्यक.<br>ड) M.D.(P.S.M.) असल्यास प्राधान्य व मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| | | प्रतिनियुक्ती | (नामनिर्देशन योग्य अधिकारी उपलब्ध न झाल्यास) नामनिर्देशनासाठी विहीत केलेली शैक्षणिक अर्हता व अनुभव धारण करणा-यां शासनाकडील योग्य अधिका-यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| **६६** | **निवासी वैद्यकिय अधिकारी (आर.एम.ओ.)** गट -अ वैद्यकिय सेवा | नामनिर्देशन/ सरळ सेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची M.D / M.S.(Clinical) परिक्षा उत्तीर्ण.<br>ब) रुग्णालय प्रशासन पदविका (D.H.A.) धारण करणाऱ्या उमेदवारास प्राधान्य.<br>क) शासकीय / निमशासकीय / खाजगी रुग्णालयातील वैद्यकिय तज्ञ / वैद्यकिय अधिकारी पदावरील किमान ०३ वर्षाचा पर्यवेक्षीय व कार्यकारी पदाचा अनुभव आवश्यक. |
| **६७** | **युनानी चिकित्सक** गट -ब वैद्यकिय सेवा | नामनिर्देशन/ सरळ सेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची BUMS (युनानी शास्त्र) परिक्षा उत्तीर्ण<br>ब) शासकीय / निमशासकीय रुग्णालयातील युनानी चिकित्सक / वैद्यकिय अधिकारी युनानी पदावरील किमान ०३वर्षाचा पर्यवेक्षीय व कार्यकारी पदाचा अनुभव आवश्यक. |
| **६८** | **स्टाफ नर्स** गट -क वैद्यकिय सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कार्यरत परिचारीका मिडवाईफ ( A.N.M ) या पदाचा किमान ०३ वर्षाचा अनुभव सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **६९** | **हिवताप पर्यवेक्षक** गट -क वैद्यकिय सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या वरिष्ठ क्षेत्र कार्यकर्ता या संवर्गातील उपरोक्त अर्हता धारण करणाऱ्या कर्मचाऱ्या मधुन सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नेमणुक व कामाचा ०३ वर्षाचा अनुभव. |
| **७०** | **औषध निर्माता (फार्मासिस्ट)** गट -क वैद्यकिय सेवा | नामनिर्देशन/ सरळ सेवा १००% | अ) उच्च माध्यमिक शालांत परिक्षा (विज्ञान शाखा) उत्तीर्ण.<br>ब) औषध निर्माण शास्त्रातील पदविका (डी.फार्म).<br>क) औषध निर्माण शास्त्रातील पदवीधर (बी.फार्म) उमेदवारास प्राधान्य.<br>ड) महाराष्ट्र फार्मसी कौन्सीलकडील नोंदणी प्रमाणपत्र (महाराष्ट्र फार्मसी ॲक्ट १९४८ नुसार वैध नोंदणी प्रमाणपत्र).<br>इ) संबधित कामाचा ०३ वर्षाचा अनुभव आवश्यक. |
| **७१** | **परिचारीका मिडवाईफ (ए.एन.एम.)** गट -क वैद्यकिय सेवा | नामनिर्देशन/ सरळ सेवा १००% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक मंडळाची माध्यमीक शालांत परिक्षा उत्तीर्ण.<br>ब) शासन मान्यता प्राप्त संस्थेचा ए.एन.एम. अभ्यासक्रम पूर्ण व त्यानंतर कामाचा ०३ वर्षाचा अनुभव आवश्यक.<br>क) महाराष्ट्र नर्सिंग कौन्सिलची नोंदणी आवश्यक. |
| **७२** | **प्रयोगशाळा तंत्रज्ञ** गट -क वैद्यकिय सेवा | नामनिर्देशन/ सरळ सेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठाची रसायन शास्त्र / जीवशास्त्र / सुक्ष्म जिवशास्त्र या विषयातील पदवी.<br>ब) मान्यता प्राप्त संस्थेची डी. एम. एल. टी. उत्तीर्ण.<br>क) वैद्यकिय प्रयोग शाळेतील किमान ०३ वर्षाचा अनुभव आवश्यक. |
| **७३** | **वरिष्ठ क्षेत्र कार्यकर्ता** गट -क वैद्यकिय सेवा | सरळसेवा १००% | अ) मान्यता प्राप्त विद्यापिठाची प्राणी शास्त्र किंवा सुक्ष्म जिवशास्त्रातील पदवी.<br>ब) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |

**अग्निशमन सेवा**

| | | | |
|---|---|---|---|
| **७४** | **मुख्य अग्निशमन अधिकारी**<br>गट -अ<br>अग्निशमन सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सहाय्यक अग्निशमन अधिकारी या पदावर किमान ०३ वर्ष नियमित सेवा पूर्ण झालेल्या व मान्यता प्राप्त विद्यापिठाची पदवी धारण करणाऱ्या अधिकाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| | | प्रतिनियुक्ती | पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध होत नसल्यास सदर अधिकारी उपलब्ध होईपर्यंत केंद्र / राज्य /निमशासकीय / स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या सेवेतील समकक्ष पद किमान ०३ वर्षापासुन धारण करण्याऱ्या अग्निशमन सेवेतील अधिकाऱ्यामधुन प्रतिनियुक्तीच्या धोरणानुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| **७५** | **सहायक अग्निशमन अधिकारी**<br>गट -ब<br>अग्निशमन सेवा | पदोन्नती १००% | अ)अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अग्निमशमन केंद्र अधिकारी या पदावर किमान ०३ वर्ष नियमित सेवा पूर्ण झालेल्या व मान्यता प्राप्त विद्यापिठाची पदवी धारण करणाऱ्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>ब) विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक |
| **७६** | **अग्निशमन केंन्द्र अधिकारी**<br>गट -क<br>अग्निशमन सेवा | नामनिर्देशन/सरळ सेवा २५% | अ) किमान शैक्षणीक व तांत्रीक पात्रता :-<br>१. मान्यताप्राप्त विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी उत्तीर्ण. २. राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपुर येथुन B.E.Fire Engg. उत्तीर्ण किंवा अग्नीशमन सेवा नागपुर यांच्याकडील Divisional Fire Officer पाठ्यक्रम (अग्निशमन अभियांत्रिकीमधील प्रगत पदविका) उत्तीर्ण असावा किंवा दि इन्स्टीटयूट ऑफ फायर इंजिनियअर्स (यु.के.) किंवा (इंडिया) या संस्थेकडील सदस्यत्व (M.I.Fire) किंवा कोणत्याही शाखेची पदवी प्राप्त केल्यानतंर (The Institution of Fire Engineers (U.K.) यांचे सदस्यत्व प्राप्त करणे आवश्यक ३. मराठीचे ज्ञान असणे आवश्यक आहे. (लिहिणे, वाचणे व बोलणे)<br>३. एम.एस.सी.आय.टी. परीक्षा उत्तीर्ण असावा. |
| | | पदोन्नती ७५% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील प्रमुख अग्निशमन विमोचक या पदावर किमान ३ वर्ष नियमित सेवा पूर्ण झालेल्या व मान्यता प्राप्त विद्यापीठाची पदवीधारण करणाऱ्या कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **७७** | **प्रमुख अग्निशमन विमोचक**<br>गट -क<br>अग्निशमन सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अग्निशामक या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण केलेल्या पात्र कर्मचाऱ्यांची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्तीकरता येईल. |
| **७८** | **चालक यंत्र चालक**<br>गट -क<br>अग्निशमन सेवा | नामनिर्देशन/ सरळ सेवा १००% | अ. किमान शैक्षणिक व तांत्रिक पात्रता-<br>माध्यमीक शालांत परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक, जड वाहनचालक म्हणून ३ वर्षे काम केल्याचा अनुभव असणे आवश्यक, वैध जड वाहन चालविण्याचा परवाना, राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र / महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी, महाराष्ट्र शासन मुंबई / नागपुर किंवा ऑल इंडिया इंस्टीटयुट लोकल सेल्फ गव्हरमेंट मुंबई / नागपुर यांचा सहा महीने कालावधीचा अग्निशामक प्रशिक्षण पाठयक्रम उत्तीर्ण असावा.<br>**ब. शारीरीक पात्रता**<br>१. उंची १६५ से.मी. (महिला उमेदवारांसाठी १५७ से.मी.)<br>२. छाती - साधारण किमान ८१ से.मी.,फुगवुन- ५ से.मी. जास्त. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | (महिला उमेदवारांसाठी लागू नाही.)<br>३. वजन - किमान ५० कि.ग्रॅ. पेक्षा कमी नसावे. व महिला साठी ४६ किलो पेक्षा कमी नसावे.<br>४. दृष्टी - चांगली (विना चष्माचे दृष्टी ६/६ तसेच Ishinhara Chart नुसार रंगदृष्टी चांगली)<br>क. वयोमर्यादा : उमेदवाराचे वय वर्षे ३० पेक्षा अधिक नसावे. |
| **७९** | **अग्निशामक**<br>गट -क<br>अग्निशमनसेवा | नामनिर्देशन<br>सरळ सेवा<br>१००% | अ. शैक्षणिक व तांत्रिक पात्रता-<br>१.महाराष्ट्र राज्य माध्यमीक उच्च माध्यमीक शिक्षण मंडळाची माध्यमीक शालांत परीक्षा (एस.एस.सी.) उत्तीर्ण असणे आवश्यक,<br>२.राष्ट्रीय/राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र / महाराष्ट्र शासन मुंबई/नागपुर यांचा सहा महीने कालावधीचा अग्निशमन प्रशिक्षण पाठ्यक्रम उत्तीर्ण असावा.<br>३. MSCIT परिक्षा उत्तीर्ण.<br>४.मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>ब. शारीरीक पात्रता-<br>१. उंची १६५ से.मी. (महिला उमेदवारांसाठी १५७ से.मी.)<br>२. छाती - साधारण किमान ८१ से.मी., फुगवुन- ५ से.मी. जास्त. (महिला उमेदवारांसाठी लागू नाही.)<br>३. वजन - किमान ५० कि.ग्रॅ. पेक्षा कमी नसावे व महिला साठी ४६ किलो पेक्षा कमी नसावे.<br>४.दृष्टी - चांगली (विना चष्माचे दृष्टी ६/६ तसेच Ishinhara Chart नुसार रंगदृष्टी चांगली)<br>वयोमर्यादा : उमेदवाराचे वय वर्षे ३० पेक्षा अधिक नसावे. |

**स्वच्छता सेवा**

| | | | |
|---|---|---|---|
| **८०** | **मुख्य स्वच्छता अधिकारी**<br>गट-ब<br>प्रशासकीय सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उपमुख्य स्वच्छता अधिकारी या संवर्गातील किमान ०३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेला व मान्यता प्राप्त विद्यापिठाची पदवीधारण करणाऱ्या व L.G.S. पदविका उत्तीर्ण झालेला कर्मचाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **८१** | **उपमुख्य स्वच्छता अधिकारी**<br>गट -क<br>स्वच्छता सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील वरिष्ठ स्वच्छता निरीक्षक या पदावर किमान ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण केलेल्या कर्मचा-याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेनुसार पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **८२** | **वरिष्ठ स्वच्छता निरीक्षक**<br>गट -क<br>स्वच्छता सेवा | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील स्वच्छता निरीक्षक या संवर्गातील किमान ०३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचा-यास सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **८३** | **स्वच्छता निरीक्षक**<br>गट -क<br>स्वच्छता सेवा | नामनिर्देशन/<br>सरळ सेवा ५०% | अ) मान्यता प्राप्त विद्यापिठाची पदवी.<br>ब) स्वच्छता निरिक्षक पदविका उत्तीर्ण.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| | | पदोन्नती ५०% | अ) स्वच्छता निरीक्षक पदविका उत्तीर्ण.<br>ब) अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील लिपिक या पदावरील किमान ३ वर्ष नियमित सेवा पूर्ण केलेल्या व अनुभव धारण करणा-या महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे कर्मचा-यास पदोन्नती नियुक्ती करता येईल. |
| **८४** | **मुकादम ( स्वच्छता)** | पदोन्नती १००% | अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सफाई कामगार या |

| | | | |
|---|---|---|---|
| | गट -ड<br>स्वच्छता सेवा | | संवर्गातील किमान ०३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्यास सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| **८५** | **सफाई कामगार**<br>गट -ड<br>स्वच्छता सेवा | नामनिर्देशन /<br>सरळ सेवा<br>१००% | अ) इयत्ता ७ वी उत्तीर्ण.<br>ब) मराठी लिहीता, वाचता व बोलता येणे आवश्यक.<br>क) लाड-पागे कमिटीच्या शिफारशीनुसार वशिला पध्दतीने. |

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb344 18f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7 544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.06.20 17:07:26 +05'30'

( विद्या हम्पय्या )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

# अकोला महानगरपालिका कर्मचाऱ्यांसाठी विभागीय परिक्षा नियम, २०२४

**परिशिष्ट-(३)**

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम (सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रं.-५९) च्या कलम-४६५, पोटकलम-(१) खंड (ल) च्या तरतुदीनुसार अकोला महानगरपालिकेसाठी केलेले नियम :-

## नियम

१. **संक्षिप्त शिर्षक व नियम लागु होण्याचा दिनांक :-**

**अ)** या नियमास "अकोला महानगरपालिका कर्मचाऱ्यांसाठी (अर्हताकारी विभागीय परिक्षा ) नियम, २०२४" असे संबोधण्यात येईल.

**ब)** **शासन राजपत्रात** प्रसिध्द होतील, त्या तारखेपासुन हे नियम अंमलात येतील,

२. **व्याख्या :-** विषयांत किंवा संदर्भानुसार अन्य अर्थ अभिप्रेत नसल्यास या नियमानुसार,

**(२.१)** "अधिनियम " म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९.

**(२.२)** "महानगरपालिका" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या तरतुदी अन्वये निर्माण केलेली "अकोला महानगरपालिका"

**(२.३)** "आयुक्त" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम-३६ अन्वये शासनाने नियुक्त केलेला अधिकारी.

**(२.४)** "कर्मचारी " म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील प्रकरण-४, कलम-५१ (४) अन्वये नेमणुक केलेले अधिकारी / कर्मचारी. परंतु यात रोजंदारी, हजेरीपटावर असलेले कामगार आणि कंत्राटी पध्दतीने तसेच, अंशकालीन व मानसेवी स्वरुपी नेमण्यात आलेल्या व्यक्तींचा समावेश होत नाही.

**(२.५)** "परिशिष्ट" म्हणजे, या नियमांना जोडलेले परिशिष्ट.

**(२.६)** "विभागीय परिक्षा" म्हणजे, अकोला महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी विहित केलेली व अकोला महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२४ सोबतच्या परिशिष्ट-(३) मध्ये नमुद करण्यात आलेली विभागीय परिक्षा.

ज्या शब्दांची वा शब्दसमुहांची व्याख्या या नियमांत समाविष्ठ करण्यात आली नसेल, त्यांचा अर्थ अधिनियमात ते ज्या अर्थाने वापरले असतील तसा समजण्यात येईल.

३. **विभागीय परिक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य :-**

**(३.१)** हे नियम अतिस्तवात आल्याच्या तारखेस अकोला महानगरपालिका आस्थापनेवरील स्थायी / अस्थायी स्वरुपात कोणत्याही पदावर नियुक्त असलेल्या व त्या तारखे नंतर नियुक्त होणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना परिशिष्ट-३ च्या (ब) व (क) मध्ये विहित केलेली आवश्यक ती विभागीय परिक्षा उत्तिर्ण होणे अनिवार्य असेल.

**(३.२)** परिशिष्ट-३ (अ) मध्ये ज्या संवर्गाचा उल्लेख आलेला नसेल, त्या संवर्गातील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या तांत्रिक ज्ञानाची लेखी व तोंडी परिक्षा आयुक्तांच्या मान्यतेने घेतली जाईल. याकरीता किमान ३० दिवसापेक्षा कमी नाही ऐवढा कालावधीची पुर्व सुचना संबंधीतास देण्यात येईल.

**४. कालावधी आणि संधीची व्याख्या :-**

**(४.१)** शासन राजपत्राच्या दिनांकापुर्वी नियुक्त केलेल्या व्यक्तींकरीता कालावधी व संधीची संख्या या नियमांच्या अधिन राहुन, शासन राजपत्राच्या दिनांकापुर्वी महानगरपालिका कर्मचारी म्हणुन नियुक्त झालेल्या व सध्या अस्तित्वात असलेल्या नियमान्वये परिक्षा उतिर्ण न झालेल्या व्यक्तीने, तीला परिक्षा उतिर्ण होण्यामधुन नियम-१० अन्वये सुट दिलेली नसेल, तर शासन राजपत्राच्या दिनांकापासुन ०३ वर्षाच्या आत व ०२ संधीमध्ये परिक्षा उतिर्ण होणे आवश्यक आहे.

**(४.२)** अकोला महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२४ नुसार नियुक्त कर्मचाऱ्यांनी त्यांची नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासुन ०४ वर्षात ०३ संधीमध्ये विभागीय परिक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

**५. परिक्षा उत्तीर्ण होण्यासाठी मानक :-**

**(५.१)** अकोला महानगरपालिका तर्फे आयोजित केल्या जाणाऱ्या परिक्षा उत्तीर्ण होण्यासाठी प्रत्येक प्रश्न पत्रीकेच्या एकुण गुणांच्या किमान ४०% गुण मिळविणे आवश्यक असेल.

**(५.२)** प्रत्येक संवर्गासाठी विहित करण्यात आलेल्या सर्व विषयांत वरिल तरतुदीच्या आधारे एक वा एका पेक्षा अधिक संधी उत्तीर्ण झाल्यावरच विभागीय परिक्षा उत्तीर्ण झाल्याचे समजण्यात येईल.

**६. परिक्षेचे वेळा पत्रक :-**

विभागीय परिक्षा व मराठी भाषा परिक्षा या सक्षम प्राधिकारी यांनी विहित केलेल्या अभिकरणाकडुन सर्व साधारणपणे दरवर्षी प्रशासनाच्या / अभिकरणाच्या सोईनुसार अशा परिक्षा माहे मे ते जुन महिण्यात घेतल्या जातील.

**७. परिक्षेचा अभ्यासक्रम :-**

विभागीय परिक्षेसाठीचा अभ्यासक्रम परिशिष्ट-(३)(ब) मध्ये विहित केल्याप्रमाणे किंवा शासनाने वेळोवेळी विहित केल्यानुसार असेल.

**८. प्रशिक्षण :-**

विभागीय परिक्षेस बसु इच्छीनाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी परिक्षेपुर्वी किमान ४० तासांचा प्रशिक्षण कार्यक्रम अकोला महानगरपालिकेकडुन आयोजित करण्यात येईल.

**९. परिक्षा उत्तीर्ण न झाल्यास होणारे परिणाम :-**

एखादया कर्मचारी नियम-४ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या कालमर्यादेत आणि संधी मध्ये परिक्षा उत्तीर्ण झाला नाही तर पुढील परिणाम होतील :-

**(९.१)** तो परिक्षा उत्तीर्ण होईपर्यंत किंवा नियम-१० अन्वये परिक्षा उत्तीर्ण होण्यापासुन त्यास सुट मिळेपर्यंत, त्याला त्याच्या पदावर कायम करण्यात येणार नाही किंवा त्याच्या पदाच्या वेतनमानातील पुढील वेतनवाढ त्याला देण्यात येणार नाही. अशा रितीने रोखुन ठेवलेली वेतनवाढ हि, तो परिक्षा उत्तीर्ण झाल्याच्या दिनांकापासुन किंवा त्याला परिक्षा उत्तीर्ण होण्यामधुन नियम-१० अन्वये सुट देण्यात आल्याच्या दिनांकापासुन त्याला देय असेल आणि कोणतेही वेतनवाढ रोखुन न धरल्याचे समजुन पुढील सर्व वेतनवाढी देण्यात येतील. मात्र गतकाळातील थकबाकी अनुज्ञेय नसेल.

**(९.२)** त्याला त्या संवर्गातील आपली जेष्ठता गमवावी लागेल म्हणजेच जे कर्मचारी त्याच्या अगोदर परिक्षा उत्तीर्ण झाले असतील, त्या सर्व कर्मचाऱ्यांच्या नंतर त्याचा जेष्ठता क्रम लागेल. तसेच, अशा ज्या कर्मचाऱ्यांच्या नंतर त्याचा जेष्ठता क्रम लागेल, त्या कर्मचाऱ्यास जेष्ठ असणाऱ्या आणि त्यांच्या नंतर, परंतु नियम-४ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या

कालावधीत व संधी मध्ये परिक्षा उत्तीर्ण होणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या देखील नंतरचा जेष्ठता क्रम त्याला देण्यात येईल.

**१०. <u>परिक्षा उत्तीर्ण होण्यामधुन सुट :-</u>**

**(१०.१)** शासन राजपत्राच्या दिनांकापुर्वी नियुक्ती झालेल्या कर्मचाऱ्यास परिक्षा उत्तीर्ण होण्यामधुन पुढील बाबतीत सुट देण्यात येईल :-

**(अ)** त्यास यापुर्वीच कर्मचारी म्हणुन कायम करण्यात आले असेल अशा प्रकरणी किंवा

**(ब)** तो हे शासन राजपत्र प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापूर्वी अस्तित्वात असलेल्या नियमान्वये यापुर्वीच परिक्षा उत्तीर्ण झाला असेल अशा प्रकरणी किंवा

**(१०.२)** कोणत्याही दिनांकास कर्मचारी ४५ वर्ष वयाचा झाल्यानंतर त्यास परिक्षा उत्तीर्ण होण्यापासुन सुट देण्यात येईल.

**११.** परिक्षा सर्वसाधारण पणे वर्षातुन एकदा घेण्यात येईल एखादया वर्षी जर कोणत्याही कारणास्तव परिक्षा घेण्यात आली नाही, तर कालावधी व संधीची गणना करतांना कालावधी वगळण्यात येईल.

**१२. <u>विशेष योग्यता :-</u>**

एखादा कर्मचारी पहिल्याच प्रयत्नात परिक्षा उत्तीर्ण झाला असेल आणि त्याने कोणत्याही प्रश्न पत्रिकेत ७०% किंवा त्याहुन अधिक गुण मिळविले असतील तर त्या प्रश्नपत्रिकेतील त्यांच्या विशेष योग्यते बद्दलची नोंद गोपणीय अहवालात घेण्यात येईल.

**१३. <u>विषयांमध्ये सुट :-</u>**

जो उमेदवार परिक्षेमध्ये अनुउत्तीर्ण झालेला आहे परंतु ज्याने कोणत्याही प्रश्नपत्रिकेमध्ये ५५% किंवा अधिक गुण मिळविलेले आहेत त्याला त्याच्या नंतरच्या प्रयत्नांमध्ये त्या विषयासाठी परिक्षेला बसण्यातुन व उत्तीर्ण होण्यातुन सुट देण्यात येईल.

**१४. <u>निर्वचनाच्या शक्ती :-</u>**

नियमातील तरतुदीनुसार अधिकाऱ्यांच्या / कर्मचाऱ्यांच्या एखादया संवर्गास कोणती विभागीय परिक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य आहे वा कोणत्या संवर्गास हि परिक्षा उत्तीर्ण होण्यापासुन सुट आहे या संबंधी कोणताही विवाद उत्पन्न झाल्यास त्याबाबतचा आयुक्त यांचा निर्णय अंतिम असेल.

VIDYA RAMAPPA
HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.06.20 17:07:42 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

## परिशिष्ट-३ (अ)

(नियम-३)

**विभागीय परिक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य असलेले संवर्ग.**

| अ.क्र. | विभाग | संवर्ग |
|---|---|---|
| १. | प्रशासकीय सेवा | अधीक्षक |
| २. | लेखा व वित्त सेवा/ लेखा परिक्षण सेवा | उपलेखापाल,वरिष्ठ लेखा परिक्षक |
| ३. | स्वच्छता सेवा | वरीष्ठ स्वच्छता अधिकारी |

**परिशिष्ट-ब-२ मध्ये विहित केलेल्या परिक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य असलेले संवर्ग :-**

| अ.क्र. | विभाग | संवर्ग |
|---|---|---|
| १. | अग्निशमन सेवा | अग्निशमन केंन्द्र अधिकारी, प्रमुख अग्निशमन विमोचक / चालक यंत्रचालक / अग्निशामक व संबंधीत संवर्ग |

**महानगरपालिका व्यतिरिक्त इतर प्राधिकाऱ्याकडुन घेतल्या जाणाऱ्या विहित विभागीय परिक्षा**

| अ.क्र. | विभाग | परिक्षा घेणारा प्राधिकारी | संवर्ग |
|---|---|---|---|
| १. | अग्निशमन | अग्निशमन महाविद्यालय नागपुर / मुंबई | अग्निशमन विभागातील पदे |
| २. | अभियांत्रिकी स्थापत्य / विद्युत / यांत्रिकी | अभियांत्रीकी अधिकारी महाविद्यालय,नाशिक | कनिष्ठ अभियंता / उपअभियंता व इतर तांत्रिक पदे |

**परिशिष्ट- ३ (ब)**

**विभागीय परिक्षा**

**प्रशनपत्रिका-१** **(गुण-१००, वेळ-३ तास )**

**१.** सारांश लेखन
**२.** टिप्पणी लेखन
**३.** पत्र लेखन
**४.** भाषांतर (इंग्रजीतुन मराठीत)

---

**प्रश्नपत्रिका-२** **(पुस्तकांसह)** **(गुण-१००, वेळ-३ तास )**

**१.** महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९
**२.** किमान वेतन अधिनियम १९४८
**३.** माहितीचा अधिकार अधिनियम २००५
**४.** महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम २०१५
**५.** वस्तु व सेवा कर
उक्त अधिनियमाच्या तरतुदीनुसार असलेले प्राधिकारी यांचे कर्तव्ये, जबाबदाऱ्या व कामकाजाची पध्दत

---

**प्रश्नपत्रिका-३** **(पुस्तकांसह)** **(गुण-१००, वेळ-३ तास )**

१) सर्व महाराष्ट्र नागरी सेवा नियम :-
सेवेच्या सर्वसाधारण शर्ती
रजा
वेतन
वर्तणुक, शिस्त व अपिल
निवृत्ती वेतन नियम
२) विभागीय चौकशी नियम पुस्तीका
३) रचना व कार्यपध्दती- सहा गठ्ठे पध्दती
४) कार्यालयीन नियम पुस्तीका, जमाखर्च लेखा परिक्षा
५) प्राथमिक हिशोब तपासणी

---

**टिप-** या प्रश्नपत्रिकेचे माध्यम मराठी असेल व प्रश्नाची उत्तरे मराठी भाषेत दयावी लागतील.

**लेखा विभाग / लेखा परिक्षण विभागातील संवर्गातील पदांना प्रश्नपत्रिका १, २, ३, व्यतिरिक्त पुढे विहित करण्यात आलेल्या विषयांचा परिक्षेत उत्तीर्ण व्हावे लागेल.**

**प्रश्नपत्रिका-४ (पुस्तकांसह) (गुण-१००, वेळ-३ तास )**

१. मुंबई वित्तीय नियम १९५९
२. महाराष्ट्र अर्थ संकल्प नियम पुस्तीका प्रकरण क्रं.४, ५, ७, ९, व १७ तसेच परिशिष्टे २, ४, ८, ९, ११ वगळुन
३. महाराष्ट्र सार्वजनिक खर्च नियमावली, १९६५ तसेच नियमावली १९९२
४. महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमावलीतील २, ३, ६, ७, ८, ९, १०, ११, १२-१ ते १२-५ प्रकरणे
५. महानगरपालिकेच्या निविदेसाठीच्या सर्वसाधारण अटी व शर्ती

---

**प्रश्नपत्रिका-५ (पुस्तकांसह) (गुण-१००, वेळ-३ तास )**

१. Book Keeping & Accountancy
२. Accrual Based Double Entry Accounting
३. मुंबई प्राथमिक शिक्षण अधिनियम १९४७
४. मुंबई प्राथमिक शिक्षण नियम १९४९

---

**गट-क च्या कर्मचाऱ्यांना गट-ब च्या पदावर पदोन्नती मिळण्यापुर्वी या परिशिष्टातील प्रश्न पत्रिका १, २ व ३ व्यतिरिक्त खालील प्रश्नपत्रिकेत उत्तीर्ण होणे आवश्यक असेल.**

**प्रश्नपत्रिका-६ (पुस्तकांसह) (गुण-१००, वेळ-३ तास )**

१. महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६
२. महानगरपालिका (घनकचरा व्यवस्थापन) उपविधी, २००२
३. महाराष्ट्र (नागरी क्षेत्र) वृक्षांचे जतन अधिनियम १९७५
४. राष्ट्रीय नागरी उपजिविका अभियान
५. झोपडपट्टी सुधार समिती
६. दिव्यांगासाठीच्या शासनाच्या सवलती व योजना
७. समाज विकास व बाल कल्याण संबंधीच्या शासनाच्या व महानगरपालिकेच्या योजना
८. केंद्र व महाराष्ट्र शासनाच्या नगरविकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजना

## परिशिष्ट ३ (क)

## विभागीय परिक्षा ( अग्निशमन)

## विभाग- अग्निशमन

**संवर्ग- अग्निशमन केंद्र अधिकारी / प्रमुख अग्निशमनविमोचक/ चालक यंत्र चालक / अग्निशामक संबंधीत संवर्ग (अग्निशमन)**

**१. तोंडी व प्रात्यक्षिक परिक्षा :-** **(गुण-१००)**

| | | |
|---|---|---|
| १. | रासायनिक अग्निशामके | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| २. | शिडया | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ३. | होज पाईप | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ४. | फोम व होम साधने | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ५. | हायड्रंट व होज फिंटिंग्ज | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ६. | पंप | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ७. | वॉटर रिले | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ८. | गाठी | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ९. | श्वसन उपकरणे | - साहित्यांची नावे व वापर |
| १०. | कवायत | - आज्ञापालन व सहकाऱ्याबरोबर कवायत करण्याची क्षमता |

**२. लेखी परिक्षा :-** **(गुण- १००, वेळ- २ तास)**

**१. प्रथमोपचार** -प्रथमोपचार पेटीतील साहित्य व भाजणे, अस्थिभंग, घुसमटने, रक्तस्त्राव, जखमा यांचेवर करावयाच्या प्रथमोपचाराची माहिती देणे.

**२. वॉचरुम कार्यपध्दती** - वॉचरुम मध्ये ठेवल्या जाणाऱ्या रेकॉडची माहिती, त्यासाठी वापरली जाणारी कार्यपध्दती नमुने व काल्पनिक संदेशावर वॉचरुमच्या रेकॉड मध्ये नोंद करणे.

**३. अग्निशामक व ड्रायव्हर**- पदांच्या कर्तव्याची माहिती असणे व ती कर्तव्य पारपाडण्यासाठी कराव्या लागणाऱ्या कामाबद्दचा तपशील ड्रायव्हर ऑपरेटर पदाची कर्तव्य

**४. शिस्त व कर्तव्य पालन**- शिस्तीचे व कर्तव्य पालनाचे अग्निशमन विभागातील महत्व व त्यांचे पालन न झाल्यास होणारे परिणाम कर्तव्य पालन न झाल्यामुळे वा झाल्यामुळे आठवणीत राहीलेल्या एखादया प्रसंगाचे वर्णन.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.06.20 17:08:06 +05'30'

( विद्या हम्पय्या )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

## परिशिष्ट ४

## नामनिर्देशन / सरळसेवा भरती करतांना अग्निशमन विभागासाठी निकष व गुणांकन पध्दती

**१. शैक्षणिक अर्हता व अनुभव :-**

१.१ अग्निशमन पदासाठी शैक्षणिक अर्हता व अनुभव हा सदर नियमांच्या परिशिष्ट- (२) मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहील.

१.२ शारीरिक पात्रता :-

| पुरुष | महिला |
|---|---|
| • उँची — किमान १६५ सें.मी. (अनवाणी)<br>• छाती — न फुगविता ८१ सें.मी., फुगवुन ८६ सें.मी. (किमान ५ सें.मी. फुगवणे आवश्यक)<br>• वजन — ५० कि.ग्रॅ.<br>• दृष्टी — सामान्य, (विना चष्माने दृष्टी-६/६ तसेच Ishihara Chart नुसार रंग दृष्टी चांगली)<br>• वर्णांधता आजारापासून मुक्त असावा.<br>• उमेदवार शारीरिक व मानसिकदृष्टया सुदृढ असावा. | • उँची — किमान १५७ सें.मी. (अनवाणी)<br>• छाती —महिला उमेदवारांसाठी लागु नाही.<br>• वजन — ४६ कि.ग्रॅ.<br>• दृष्टी — सामान्य, (विना चष्माने दृष्टी-६/६ तसेच Ishihara Chart नुसार रंग दृष्टी चांगली)<br>• वर्णांधता आजारापासून मुक्त असावा.<br>• उमेदवार शारीरिक व मानसिकदृष्टया सुदृढ असावा. |

**२. परिक्षेचे टप्पे :-**

प्रस्तुत परिक्षा एकुण २ टप्यात घेण्यात येईल :-

१) लेखी परिक्षा- १०० गुण. २) शारीरीक चाचणी- १०० गुण.

**२.१ लेखी परीक्षा:-**

१. लेखी परिक्षा (तांत्रीक / सामान्य ज्ञान) १०० गुणांची असेल.

२. लेखी परीक्षेसाठी उमेदवाराकडे सेवा भरती नियमात नमुद शैक्षणीक पात्रता / तांत्रीक शिक्षणाची अर्हता तसेच शारीरिक क्षमता असणे आवश्यक राहील.

३. जाहिरातीस असणारा एकूण प्रतिसाद विचारात घेवुन आवश्यक तेवढया (साधारणत: १:५ किंवा १:७ या प्रमाणात) उमेदवारांना शारिरीक चाचणी परिक्षेस पात्र ठरविण्यात येईल.

४. लेखी परिक्षेकरीता विहित केलेले किमान गुण प्राप्त करणारे उमेदवार शारिरीक चाचणीसाठी पात्र ठरतील.

**२.२ मैदानी चाचणी (पुरुषांसाठी) (१०० गुण)**

**अ. १६०० मिटर धावणे (३० गुण)**

| १६०० मि. अंतर पूर्ण करण्यास लागलेला कालावधी | द्यावयाचे गुण |
|---|---|
| ५ मि. १० सेंकद किंवा त्यापेक्षा कमी | ३० |
| ५ मि. १० सेंकदापेक्षा जास्त परंतु ५ मि. ३० सेंकद किंवा त्यापेक्षा कमी | २७ |
| ५ मि. ३० सेंकदापेक्षा जास्त परंतु ५ मि. ५० सेंकद किंवा त्यापेक्षा कमी | २४ |
| ५ मि. ५० सेंकदापेक्षा जास्त परंतु ६ मि. १० सेंकद किंवा त्यापेक्षा कमी | २१ |
| ६ मि. १० सेंकदापेक्षा जास्त परंतु ६ मि. ३० सेंकद किंवा त्यापेक्षा कमी | १८ |

| | |
|---|---|
| ६ मि. ३० सेंकदापेक्षा जास्त परंतु ६ मि. ५० सेंकद किंवा त्यापेक्षा कमी | १५ |
| ६ मि. ५० सेंकदापेक्षा जास्त परंतु ७ मि. १० सेंकद किंवा त्यापेक्षा कमी | १० |
| ७ मि. १० सेंकदापेक्षा जास्त परंतु ७ मि. ३० सेंकद किंवा त्यापेक्षा कमी | ०५ |
| ७ मि. ३० सेंकदा पेक्षा जास्त | ०० |

**ब.** जमिनीपासून ३३ फुट उंचीवरील खिडकीस लावलेल्या (४६.४ वरील उंचीच्या) ॲल्युमिनियम एक्सटेंशन शिडीवर खिडकीपर्यंत वर चढुन त्याच शिडीने खालील उतरणे. (आरंभ रेषेपासून शिडी २० फुट अंतरावर असेल) (२० गुण)

| **वेळ (सेंकदामध्ये)** | **द्यावयाचे गुण** |
|---|---|
| २० सेंकदापर्यत | २० |
| २० सेंकदापेक्षा जास्त ते २५ सेंकदापर्यंत | १६ |
| २५ सेंकदापेक्षा जास्त ते ३० सेंकदापर्यंत | १२ |
| ३० सेंकदापेक्षा जास्त ते ३५ सेंकदापर्यंत | ०८ |
| ३५ सेंकदापेक्षा जास्त ते ४० सेंकदापर्यंत | ०४ |
| ४० सेंकदापेक्षा जास्त | ०० |

**क.** ५० कि.ग्रॅ. वजनाची मानवीय प्रतिकृती खांद्यावर घेवुन दिलेल्या चौकोनी मार्गाने ६० मीटर अंतर धावणे.(२० गुण)

| **वेळ (सेंकदामध्ये)** | **द्यावयाचे गुण** |
|---|---|
| २० सेंकदापर्यत | २० |
| २० सेंकदापेक्षा जास्त ते २५ सेंकदापर्यंत | १६ |
| २५ सेंकदापेक्षा जास्त ते ३० सेंकदापर्यंत | १२ |
| ३० सेंकदापेक्षा जास्त ते ३५ सेंकदापर्यंत | ०८ |
| ३५ सेंकदापेक्षा जास्त ते ४० सेंकदापर्यंत | ०४ |
| ४० सेंकदापेक्षा जास्त | ०० |

**ड.** २० फुट उंची पर्यंत रस्सीवर चढणे व उतरणे (२० गुण)

रस्सी पूर्ण चढल्यास २० गुण, ¾(तीन चतुर्थांश) चढल्यास १० गुण, ½(अर्धी) चढल्यास ५ गुण तर अर्ध्यापेक्षा कमी अंतर चढल्यास शुल्य गुण दिले जातील. (रस्सीवर चढतेवेळी फक्त हाताचा वापर करणे बंधनकारक राहील. पायाचा वापर करता येणार नाही, केल्यास शून्य गुण मिळतील.)

**इ.** २० पुल-अप्स (१० गुण)

प्रत्येक पुल-अप्सला १/२ (अर्धा) गुण, याप्रमाणे २० पुल-अप्स पूर्ण केल्यास १० गुण देण्यात येतील.

**२.३ मैदानी चाचणी (महिलांसाठी) (१०० गुण)**

**अ. ८०० मिटर धावणे (३० गुण)**

| ८०० मि. अंतर पूर्ण करण्यास लागलेला कालावधी | द्यावयाचे गुण |
|---|---|
| २ मि. ५० सेंकदापर्यंत | ३० |
| २ मि. ५० सेंकदापेक्षा जास्त परंतु ३ मि. ०० सेंकदापर्यंत | २७ |
| ३ मि. ०० सेंकदापेक्षा जास्त परंतु ३ मि. १० सेंकदापर्यंत | २४ |
| ३ मि. १० सेंकदापेक्षा जास्त परंतु ३ मि. २० सेंकदापर्यंत | २१ |
| ३ मि. २० सेंकदापेक्षा जास्त परंतु ३ मि. ३० सेंकदापर्यंत | १८ |
| ३ मि. ३० सेंकदापेक्षा जास्त परंतु ३ मि. ४० सेंकदापर्यंत | १५ |
| ३ मि. ४० सेंकदापेक्षा जास्त परंतु ३ मि. ५० सेंकदापर्यंत | १० |
| ३ मि. ५० सेंकदापेक्षा जास्त परंतु ४ मि. ०० सेंकदापर्यंत | ०५ |
| ४ मि. ०० सेंकदापेक्षा जास्त | ०० |

**ब.** जमिनीपासून ३३ फुट उंचीवरील खिडकीस लावलेल्या (४६".४' वरील उंचीच्या) ॲल्युमिनियम एक्सटेंशन शिडीवर खिडकीपर्यंत वर चढुन त्याच शिडीने खालील उतरणे. (आरंभ रेषेपासून शिडी २० फुट अंतरावर असेल) (२० गुण)

| वेळ (सेंकदामध्ये) | द्यावयाचे गुण |
|---|---|
| ३० सेंकदापर्यत | २० |
| ३० सेंकदापेक्षा जास्त ते ४० सेंकदापर्यंत | १५ |
| ४० सेंकदापेक्षा जास्त ते ५० सेंकदापर्यंत | १० |
| ५० सेंकदापेक्षा जास्त ते ६० सेंकदापर्यंत | ०५ |
| ६० सेंकदापेक्षा जास्त | ०० |

**क.**४० कि.ग्रॅ. वजनाची मानवीय प्रतिकृती खांद्यावर घेवुन दिलेल्या चौकोनी मार्गाने ६० मीटर अंतर धावणे.(२० गुण)

| वेळ (सेंकदामध्ये) | द्यावयाचे गुण |
|---|---|
| २५ सेंकदापर्यत | २० |
| २५ सेंकदापेक्षा जास्त ते ३० सेंकदापर्यंत | १६ |
| ३० सेंकदापेक्षा जास्त ते ३५ सेंकदापर्यंत | १२ |
| ३५ सेंकदापेक्षा जास्त ते ४० सेंकदापर्यंत | ०८ |
| ४० सेंकदापेक्षा जास्त ते ४५ सेंकदापर्यंत | ०४ |
| ४५ सेंकदापेक्षा जास्त | ०० |

**ड.** गोळा फेक(गोळयाचे वजन ४ कि.ग्रॅ.) (१० गुण)

| वेळ (सेंकदामध्ये) | द्यावयाचे गुण |
|---|---|
| ६ मिटर व त्यापेक्षा जास्त | १० |
| ५.५० मिटर ते ६ मिटरपेक्षा कमी | ०८ |
| ५ मिटर ते ५.५० मिटरपेक्षा कमी | ०६ |
| ४.५० मिटर ते ५ मिटरपेक्षा कमी | ०४ |
| ४ मिटर ते ४.५० मिटरपेक्षा कमी | ०२ |
| ४ मिटरपेक्षा कमी | ०० |

**इ.** लांब उडी (१० गुण)

| वेळ (सेंकदामध्ये) | द्यावयाचे गुण |
|---|---|
| १५ फुट व त्यापेक्षा जास्त | १० |
| १३ फुट ते १५ फुटपेक्षा कमी | ०८ |
| ११ फुट ते १३ फुटापेक्षा कमी | ०६ |
| ०९ फुट ते ११ फुटापेक्षा कमी | ०४ |
| ०९ फुटापेक्षा कमी | ०० |

**फ.** १० पुश अप (जोर काढणे) (१० गुण)

प्रत्येक १ पुश अप ला १ गुण, याप्रमाणे १० पुश अप पूर्ण केल्यास १० गुण देण्यात येतील.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.06.20 17:08:26 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**